बंकिमचंद्र साहित्य-माला-४

# विषवृक्ष

( संक्षेपित आवृत्ति )

:लेखक:

बंकिमचंद्र चट्टोपाध्याय

: अनुवादक—संक्षेपक :

भा. वि. वरेरकर



नवभारत प्रकाशन संस्था,

मुंबई ४.

# प्रस्तावना

● **सन** १८७२ सालीं बंकिमचंद्रांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या वंगदर्शन मासिकांत त्यांची ही चवथी कादंबरी क्रमशः प्रसिद्ध होत होती. सन १८७३ सालीं ती पुस्तक स्वरूपांत प्रसिद्ध झाली.

यापूर्वीच्या कादंबऱ्यांचीं कथानकें जशीं ऐतिहासिक स्वरूपाचीं होतीं तशींच तीं रोमँटिकही होतीं. इंग्रजी शिक्षणाचा परिणाम झालेले वाचक त्या कादंबऱ्यांकडे फारसे आपुलकीच्या दृष्टीनें पहात नव्हते. सामाजिक सुधारणेकडे तत्कालीन विद्वानांचें लक्ष आकर्षित झालेलें होतें आणि त्या काळांत कोणत्याही प्रकारच्या सामाजिक विषयाच्या भूमिकेवरून कथाकादंबरी लिहिण्याचा प्रयत्न बहुशः झाला नव्हता.

त्यावेळचे चर्चेचे मुख्य विषय होते ते बालविवाह आणि विधवाविवाह. बंगालमधील बहुजनसमाज कट्टर सनातनी वृत्तीचा होता—आजही आहे. त्यावेळीं या रूढाचारावर उघड उघड हल्ला करणें म्हणजे सोपें काम नव्हतें. महाराष्ट्रांत अशी परिस्थिती नव्हती. सनातनी समाजाप्रमाणें सुधारणावादी समाजही महाराष्ट्रांत बऱ्याच मोठ्या प्रमाणांत विद्यमान होता आणि म्हणूनच तत्कालीन लेखकांकडून 'सौभाग्यरमा' सारखें पुनर्विवाहाचें मंडन करणारें नाटक अस्तित्वांत येणें शक्य झालें.

बंगालमध्यें हा विषय अत्यंत नाजुक रीतीनें हाताळणें अवश्य होतें. प्रस्तुत कादंबरी लिहितांना बंकिमबाबूंनीं सनातनी समाजावर उघड उघड हल्ला न चढवतां त्या त्या समाजसुधारणेच्या विषयांचें दिग्दर्शन करतांना रूढाचारा-

पासून होणारे दुष्परिणाम या कादंबरीच्याद्वारें मांडले होते आणि त्याचा परिणामही अनिष्ट झाला नाहीं. किंबहुना प्राच्य आणि पाश्चात्य अशा दोन्ही शिक्षणानें विद्वत्ता संपादन केलेल्या पंडितांनाही या कादंबरीच्या वाचनामुळें आपली पूर्वीची बंगाली भाषेसंबंधीची अवहेलनेची वृत्ती सोडून देऊन या कादंबरीची स्तुती करायला सुरवात केली. त्या काळांतल्या प्रत्येक बंगालीबाबूच्या बैठकखान्यांत ही कादंबरी दिसून येत असल्याचें ' कलकत्ता रिव्ह्यू ' पत्रांत प्रसिद्ध झालेलें आहे.

प्रस्तुत कादंबरीची कथा अगदींच काल्पनिक नव्हे. १८९३ सालीं कलकत्त्याला बंकिमबाबूंना त्यांचे एक मित्र नवीनचन्द्र भेटायला आले होते, त्यावेळीं ' विषवृक्ष ' कादंबरीविषयीं चर्चा निघाली होती. प्रेमाच्या कहाणीचा अशा प्रकारचा सदोष प्रचार केल्याबद्दल नवीनचन्द्रानीं बंकिमबाबूंना दोष दिला, त्यावेळीं तिथल्या हॉलमध्यें असलेल्या आपल्या सर्वांत लहान मुलीच्या ऑईल पेन्टींगकडे बोट करून, डोळ्यांत पाणी आणून ते म्हणाले, " या मुलीनंही कुंदनंदिनीचं हतभागी अनुकरण केलं होतं. "

या कादंबरीवर स्तुतिसुमनांचा जेवढा वर्षाव झाला तितकाच तिच्यावर हल्लाही केला गेला होता. तत्कालीन सामाजिक जीवनाचें हें सुंदर चित्र होतें, तरीही तें वास्तव स्वरूपांत दिग्दर्शित केल्याचें तत्कालिन चिकित्सक साहित्यिकांना तितकेंसें पटलें नव्हतें. तरीही ही कादंबरी म्हणजे सामाजिक कादंबरीची आदिजननीच होय असें म्हणावें लागेल.

या कादंबरीच्या तंत्राचा, विषयाचा आणि क्वचित् भूमिकांचा देखील पुढील बंगाली कादंबरीकारांवर परिणाम झाल्याचें दिसून येतें. शरद्चंद्र चटर्जी यांच्या ' चरित्रहीन ' या कादंबरीवर विषवृक्षाची छाया फार मोठ्या प्रमाणांत पडली असल्याचें सूक्ष्म निरीक्षकाला दिसून येईल. त्या कादंबरीचा शेवटही पुष्कळसा विषवृक्ष कादंबरीच्या शेवटासारखाच, सूडबुद्धीनें प्रेरित झालेल्या वेडीच्या प्रवेशानेंच झालेला आहे.

अमृतलाल बसू या नाटककार नटानें या कादंबरीचें केलेलें नाट्यीकरण कित्येक वर्षे बंगाली रंगभूमीवर अभिनीत होत होतें, पण तें नाटक मात्र १९२५ सालीं वसुमती कार्यालयांतून प्रसिद्ध झालें. १८८४ सालीं लंडन येथून इंग्रजींतील Miriyam Night यांचा The poison tree या नांवानें केलेला

इंग्रजी अनुवाद प्रसिद्ध झाला होता, त्याची प्रस्तावना सर एडविन अॅर्नॉल्ड यानीं लिहून या कथेची मुक्तकंठानें तारीफ केली होती. स्वतः बंकिमबाबूंनीं Bane of life या शीर्षकाखालीं केलेला या कथेचा अनुवाद त्या वेळचे बंगालचे लेफ्टनंट गव्हर्नर इलियटसाहेब यांच्या पत्नीसाठीं करून दिला होता, पण त्याच्या हस्त-लिखिताचीं थोडीशीं पानेंच आज उपलब्ध आहेत.

प्रस्तुत कादंबरी पूर्णस्वरूपांत वाचल्याखेरीज तिचा यथातथ्य रसास्वाद मिळणें कठीण आहे. यापूर्वींच्या कादंबऱ्यांतून बंकिमबाबूंनी कथानकाची सुरवात बहुधा नौकेच्या प्रवासानेंच केली असल्याचें दिसून येतें. कपालकुंडला कादंबरीप्रमाणें याही कादंबरींत नौकेंत झालेल्या वादळाच्या पायीं नायक आणि नायिका यांची भेट झाली आहे, ही एक उल्लेखनीय घटना आहे.

हाजीकासम वाडी, मुंबई ७.
ता. ७-३-१९५४

भा. वि. वरेरकर

## –: १ :–

● **नगेंद्रदत्त** होडींतून प्रवासाला निघाला होता. जेष्ठ महिना म्हणजे तुफानाचे दिवस. ते प्रवासाला निघाले त्यावेळीं आपल्या गळ्याची शपथ घालून त्यांची पत्नी सूर्यमुखी म्हणाली, " पहा हं, होडी संभाळून न्या. तुफान होईल असं वाटलं तर लगेच किनाऱ्याला लावा. तुफान असतांना होडींत मुक्काम करूं नका. " या सर्व अटी कबूल केल्या त्याचवेळीं नगेंद्राला प्रवासाला जायची परवानगी सूर्यमुखीनें दिली. जरूरीचें काम असल्यामुळें नगेंद्राला कलकत्त्याला जाणें अवश्यमेव होतें.

नगेंद्रनाथ हा एक जमीदार होता. चांगलाच श्रीमंत होता. तो गोविंद-पुरांत रहात असे. तें गांव हरिपूर जिल्ह्यांत होतें. नगेंद्रबाबू तरूण होता. त्याचें वय तिशीच्या आसपास होतें. नगेंद्रनाथ आपल्या स्वतःच्या मोठ्या होडींतून जायला निघाला होता.

पहिले एकदोन दिवस निर्विघ्नपणें गेले. जात असतांना नदीतटाकाची शोभा पहात त्याचा काल आनंदांत गेला. नंतर एके दिवशीं आकाशांत ढगाचें छत पसरलें. नदीचें पाणी काळें पडलें. बगळे उडत जाऊं लागले. नदींत एकही लाट उसळत नव्हती—तीच धोक्याची सुचना होती.

नगेंद्र होडीवाल्यांना म्हणाला, " होडी किनाऱ्याला लावा. "

होडीचा तांडेल रहमतमुल्ला त्यावेळीं नमाज पढत होता. त्यानें उत्तर दिलें नाहीं. नावाड्याचा व्यवसाय त्यानें फारसा केलेला नव्हता. त्याचे वाडवडील मात्र नावाडी होते आणि त्या वडिलांच्या कीर्तीवरच तो आपली नावाडीगिरी मिरवीत होता. नमाज संपल्यावर तो बाबूंकडे वळून म्हणाला, " भिऊं नका हुजूर. आपण अगदीं निश्चिंत रहा. " असें सांगण्यांत फारसें मोठें धाडस

नव्हतें. किनारा अगदीं जवळ होता, थोडक्याच वेळांत होडी किनाऱ्याला लावली गेली. नावाडी खालीं उतरले आणि त्यांनी नौका नांगरून टाकली.

रहमतमुल्लाशीं देवदेवतांचा कांहीतरी विवाद असावा–कारण मोठ्या जोरानें वादळ सुरू झालें. आधीं वावटळ आली. झाडापेडांबरोबर त्या वावटळीचें मल्लयुद्ध सुरू झालें. वावटळीच्या मागोमाग तिचा भाऊ पाऊस आला. दोन्ही भावंडानीं दंगा माजवायला सुरवात केली. एकमेकांच्या खांद्यावर बसून त्या भावंडांनीं धिंगाणा घालायला सुरवात केली. एका भावंडानें रहमतमुल्लाची टोपी उडवली आणि दुसऱ्यानें त्याची दाढी भिजवून टाकली. वल्हींवाले दडी मारून बसले होते. नोकर लोक होडीची राखण करीत होते.

नगेंद्राला मोठा पेंच पडला. वादळाच्या भयानें होडींतून खालीं उतरावें तर नावाडी आपल्याला भित्रा म्हणतील आणि न उतरावें तर सूर्यमुखीला दिलेलें वचन मोडल्यासारखें होईल. तितक्यांत रहमतमुल्ला स्वतःच म्हणाला, " हुजूर ही होडी आहे जुनी, काय होईल कोण जाणे ! वादळ सारखं वाढतंय. होडींतून किनाऱ्यावर उतराल तर बरं होईल. " अर्थात नगेंद्र होडींतून उतरून किनाऱ्यावर आला.

कांहीं आसरा नसतांना वारा वावटळींत नदीतीरावर उभें राहणें सोपें नव्हतें. त्यांतून संध्याकाळ झाली होती. वादळ थांबण्याचें चिन्ह दिसत नव्हतें. अर्थात आश्रयासाठीं गांवात जाण्याचें त्यानें ठरवलें. नदीतीरापासून गांव बरेंच दूर होतें. चिखलांतून पायपीट करीत नगेंद्र गांवाकडे जायला निघाल्यावर थोड्यावेळानें पाऊस थांबला. वावटळीचा जोरही कमी झाला. मात्र आकाश ढगांनी भरून आलें होतें. रात्रीं पुन्हा वादळी पाऊस सुरू होण्याचा संभव होता, म्हणून नगेंद्र मागें न वळतां गांवाकडे जायला निघाला.

मधून मधून पावसाच्या लहानसहान सरी येत होत्या. क्वचित वावझडही येत होती. दूर अंतरावर गांवांत दिव्याचा प्रकाश दिसला. गुढगाभर पाण्यांतून आणि चिखलांतून वाट काढीत नरेंद्र त्या दिव्याच्या रोखानें चालला होता.

तो त्या दिव्यापाशीं आला तेव्हां तें एक विटामातीचें घर असल्याचें दिसून आलें. त्या घराच्या खिडकींतूनच तो दिव्याचा उजेड दिसत होता. घराचें दार मोकळेंच होतें. नगेन्द्राच्या बरोबर जो नोकर आला होता त्याला बाहेरच

ठेवून तो त्या घरांत गेला. त्या घरांतली भयानक अवस्था पाहून त्याच्या अंगावर शहारे आले.

• •

## —: २ :—

● हें घर अगदींच लहान नव्हतें, पण त्यांत संपत्तीचें लक्षण कांहींच दिसत नव्हतें. भिंती पडलेल्या होत्या. ज्या उभ्या होत्या त्या अगदीं कळकट झालेल्या होत्या. जमिनीच्या बिळांतून उंदीर घुशी बाहेर पडत होत्या. वर पाकोळया उडत होत्या. एकाच खोलींत उजेड होता. नगेन्द्र त्या खोलींत गेला.

त्या खोलींत संसारी माणसाला उपयुक्त अशा जिनसा अगदींच थोड्या होत्या आणि ज्या होत्या त्या भयंकर दारिद्र्याची साक्ष देत होत्या. एक दोन हांड्या, एक कोसळलेली चूल, दोनतीन शेगड्या तेवढ्याच तिथें दिसत होत्या. भिंती काळया मजकट झाल्या होत्या. कोंपऱ्याकोंपऱ्यांतून धूळ सांचली होती. झुरळीं, बागुरडे आणि उंदीर सर्वत्र बागडत होते. एका फाटक्या बिछान्यावर एक म्हातारा माणूस पडलेला होता. त्याचा मरणकाळ जवळ आल्याचें दिसत होतें. त्याच्या बिछान्यामागें भिंतींतून पडलेल्या एका विटेवर एक पणती तेवत होतीं. तिच्यांतलें तेलही त्या म्हाताऱ्याच्या जीवनदीपांतील तेलासारखें संपत आलें होतें. त्याच्या पायथ्याशींही अशीच एक दीपिका होती—ती एक अत्यंत सुंदर अशी बालिका होती.

त्या खोलींतील उजेड अंधुक असल्यामुळें म्हणा, अगर ती आपल्याच दुःखांत चूर झालेली असल्यामुळें म्हणा, पहिल्यानें नगेंद्राकडे तिनें मुळींच पाहिलें नाहीं.

नगेंद्रानें त्या वृद्धाच्या तोंडून त्याची कहाणी ऐकून घेतली. तीं दोघेंही या जगांत निराधार होतीं. पूर्वी त्या घरांत ऐश्वर्य नांदत होतें. आप्त गणगोत, नोकर चाकर, सारें कांहीं होतें. चंचल लक्ष्मी जायला निघाली, तिच्या पाठोपाठ तीं सारींही निघून गेलीं होतीं. त्या म्हाताऱ्याची पत्नीही स्वर्गवासी झाली होती. एकुलता एक मुलगा, वंशाचा एकटाच आधार, तोही बापाच्या नजरेसमक्ष कैलासवासी झाला होता. राहिली होती एक ही मुलगी—म्हाताऱ्याची आंधळ्याची काठी—संसारांत गुन्तवून ठेवणारी एकच गांठ.—कुंदनंदिनीचें

लग्नाचें वय झालेलें होतें, पण म्हातारा म्हणे—' आणखी थोडे दिवस जाऊंदे, कुन्देला घालवून देऊन मी कुठं जाऊं ? कोणाच्या आधारावर जगूं ? ' त्या म्हाताऱ्याला हें कळत नव्हतें कीं ज्या दिवशीं त्याला देवाघरचें बोलावणें येईल त्यावेळीं कुन्दा कुठें जाईल ?

आज तसेंच झालें होतें. यमदूत त्याच्या बिछान्याशेजारीं उभे होते—तो तर जायलाच निघाला होता—उद्यां कुंदनंदिनी कुठें जाणार होती ?

मरणाच्या दारीं राहून एकेक श्वास सोडतांना त्या म्हाताऱ्याला हीच जाणीव तीव्रतेनें होत होती. तेरा वर्षांची ती बालिका काळवंडलेल्या चेहऱ्यानें दगडाच्या पुतळीसारखी त्याच्या शेजारीं त्याच्या तोंडाकडे पहात राहिली होती. ती स्वतःला विसरली होती, उद्यां काय होणार हेंही विसरली होती, केवळ हा लोक सोडायला घाई करीत असलेल्या त्या म्हाताऱ्याच्या तोंडाकडे पहात राहिली होती.

हळुहळु म्हाताऱ्याची वाचा कुंठित होत आली. निश्वास कंठाशीं आले. डोळे निस्तेज झाले. गांजलेला पोळलेला जीव थोड्याच क्षणांत त्या यातनेंतून मोकळा झाला. त्या भयाण जागीं, मिणमिणत्या प्रकाशांत, बापाचा देह कवटाळून कुंदनंदिनी एकटीच बसली होती. बाहेर मिट्ट काळोख पसरला होता. झाडाच्या पानांवर पडणाऱ्या पावसाच्या चुटपुटत्या थेंबांचा आवाज कांनीं येत होता. वाऱ्याच्या वावझडीमुळें घराच्या दारांच्या फळ्या थडाथड वाजत होत्या. पणतींतल्या दिव्याचा प्रकाश मधुन मधून प्रेताच्या चेहऱ्यावर पडून मधुन मधून काळोखत होता. त्यांत तेल नव्हतें, चारदोन वेळ वात मोठी झाल्यासारखी दिसली आणि लगेच दिवा मालवला गेला.

मुळीसुद्धां पाऊल न वाजवतां नगेन्द्र दारांतून बाहेर आला.

● ●

—: ३ :—

● **रात्रीची** भयाण वेळ. त्या मोडक्या घरांत एकटीच कुंदनंदिनी आणि जवळ पडलेलें तिच्या बापाचें प्रेत. तिनें हांक मारली—' बाबा ! ' कुणी उत्तर दिलें नाहीं. कुंदेला वाटलें, बापाला झोंप लागली. पुन्हा वाटलें, मृत्यू का हा ! तसें म्हणवेना तिच्यानें. शेवटीं हांकही मारवेना आणि विचारही करवेना.

त्या काळोखांत हातांत पंखा घेऊन ती बापाच्या प्रेताला वारा घालूं लागली. वारा घालतां घालतां तिला झोंप येऊं लागली. कित्येक दिवसाचें जागरण आणि या दारुण दुःखानें बसलेला धक्का, यामुळें तिला तंद्री आली. हातांत तसाच पंखा घेऊन हातावर डोकें टेकून ती झोंपी गेली.

झोपेंत कुंदनंदिनीला एक स्वप्न पडलें :—तिला दिसलें,

रात्रीची वेळ—जिकडे तिकडे स्वच्छ चांदणें पडलें होतें. उजळलेल्या निळ्या आकाशांत दिसणाऱ्या चन्द्राचा परीघ हळुहळु वाढत होता. एवढ्या मोठ्या आकाराचा चंद्र कुंदेनें कधीं पाहिला नव्हता. त्या चंद्राचा प्रकाश तेजाळलेला असला तरी डोळ्यांना आनंद देणारा होता. हळुहळु तो चंद्र वाढून त्यानें सारें आकाश व्यापून टाकलें आणि त्या चंद्रमंडलांत अपूर्व अशी जोतिर्मयी देवीची मूर्ति दिसूं लागली. चंद्रमंडल सोडून ती मूर्ति आकाशांतून खालीं उतरूं लागली. त्या मूर्तीचें मुखमंडल वात्सल्यपूर्ण होतें. कुंदेनें निरखून पाहिलें तेव्हां ती मूर्ति तिला आपल्या आईसारखी दिसली. तिनें 'आई ग आई!' म्हणून हांक मारली. ती मूर्ति म्हणाली, "बेटा, खूप दुःख सोसलंस तूं. पुढेंही तुझ्या कपाळीं दुःखच आहे. पोरवय—त्यांतून हें तुझं नाजुक शरीर, तुला दुःख सहन व्हायचं नाहीं. तूं इथं राहूं नकोस. ही पृथ्वी सोडून माझ्याबरोबर ये!" कुंदेनें जणूं काय उत्तर केलें, 'कुठं जाऊं?' तेव्हां तिच्या आईनें वर आकाशाकडे बोट करून म्हटलें, 'या देशांत!' नक्षत्रांनीं खचलेल्या त्या अफाट आकाशाकडे पाहून कुंदा घाबरली आणि म्हणाली, 'इतक्या दूर जाणं व्हायचं नाहीं माझ्याकडून. तेवढी ताकद नाहीं माझ्या अंगीं.' तें ऐकून तिच्या आईची मुद्रा गंभीर झाली. ती म्हणाली, 'बेटा, तुला वाटेल तसं कर. माझ्याबरोबर आली असतीस तर बरं झालं असतं. उद्यां तुला पश्चात्ताप होईल. माझ्याकडे येण्यासाठीं तूं टाहो फोडूं लागशील, त्यावेळीं मी पुन्हा येईन. त्यावेळीं तरी माझ्या बरोबर ये. आतां मी तुला दाखवतें तें दृश्य पहा. मी तुला दोन मनुष्यमूर्ति दाखवतें. तुझं कल्याण आणि अकल्याण या माणसांच्या हातीं आहे. हीं माणसं कधीं भेटलीं तर साप समजून त्यांच्यापासून दूर रहा. तीं जातील त्या मार्गानं जाऊं नको.' तिनें पाहिलें, त्यांतील एक पुरुष होता. तो अत्यंत सुंदर आणि वत्सल-मूर्ति दिसत होता. महापुरुषाचीं सर्व लक्षणें त्याच्याठायीं दिसत होतीं. असा

हा महापुरुष अमंगलाला कारणीभूत होईल कसा, असें तिच्या मनांत येतें तोंच तिची आई म्हणाली, ' याच्या देवस्वरूपाला पाहून भुलून जाऊं नकोस. हा माणूस खरोखरच फार मोठा आहे. तरीही त्याच्याकरवीं तुझें अकल्याणच होणार आहे. याच्यापासून दूर रहा. ' पुन्हा तिच्या आईनें तिला दुसरी मूर्ति दाखवली, पण ती पुरुष नव्हती. ती काळीसांवळी होती. देखणी होती. तिला पाहूनही कुंदा घाबरली नाहीं. तिची आई म्हणाली, ' ही सांवळी बाई म्हणजे स्त्री वेषांत असलेली राक्षसी आहे असें समज. ती समोर दिसली कीं तिथून पळ काढ. ' ती असें बोलत होती तोंच जिकडे तिकडे काळोख झाला आणि त्याबरोबरच त्या सर्व मूर्ति अंतर्धान पावल्या.

त्याचवेळीं कुन्दा जागी झाली.

● ●

—: ४ :—

● **नगेंद्र** गांवांत गेला. त्या गांवाचें नांव झुमझुमपूर असल्याचें त्याला कळलें. त्याच्या विनंतीवरून गांवांतील लोक मृताच्या सत्कारासाठीं त्या घरीं आले. एक शेजारीण कुंदेजवळ राहिली. प्रेत उठवलें गेलें तेव्हां कुंदनंदिनी टाहो फोडून रडूं लागली. ती एकटीच पडली होती. सकाळीं ती शेजारीणही आपल्या घरीं गेली आणि तिनें आपली मुलगी चंपा हिला कुंदेकडे पाठवलें. ती मुलगी नानाप्रकारें कुंदेचें सांत्वन करीत होती, पण कुंदेवर त्याचा कोणताही परिणाम न होतां ती सारखी रडत आकाशाकडे पहात होती. चम्पेनें विचारलें, " शंभरवेळ आकाशाकडे काय पहातेयस ? "

कुंद म्हणाली, " काल आकाशांतून माझी आई आली होती ती मला बोलावीत होती, पण कुठली मला दुर्बुद्धी झाली, मी घाबरून तिच्या बरोबर गेलें नाहीं. आतां ती पुन्हां येईल म्हणून आकाशाकडे पहातेंय. ती आली तर मी जाईन तिच्याकडे. "

चंपा म्हणाली, " मेलेलं माणूस पुन्हा येतं का कधीं ? " तेव्हां कुंदेनें तिला स्वप्नाचा वृत्तांत सांगितला. तो ऐकून चकित होऊन चंपेनें विचारलें, " तो आकाशांत दिसलेला पुरुष तुला कधीं दिसला होता का ? "

" नाहीं—कधींच दिसला नव्हता तो मला. " कुंद म्हणाली, " भारीच सुंदर होता तो. "

इकडे दुसरे दिवशीं सगळींच उठून नगेन्द्रानें गांवच्या सर्व लोकांना बोलावून या मुलीचें पुढें काय करायचें म्हणून विचारलें. तिचें नात्यागोत्याचें कुणीच नाहीं असें त्यांनीं सांगितलें तेव्हां नगेन्द्र म्हणाला, " तर मग तुमच्यापैकीं कुणीतरी हिला आश्रय द्या. तिचं लग्न लावून द्या. सारा खर्च मी देईन. "

नगेन्द्रानें रोख रक्कम मोजली असती तर त्यांनीं कदाचित् होकार दिला असता आणि नगेन्द्र गेल्यावर कदाचित् कुंदला त्यांनीं घालवूनही दिलें असतें. म्हणूनच नगेन्द्रानें सावधगिरी दाखवली होती. रोख रक्कम न मिळाल्यामुळें कुणीही त्याच्या आश्वासनावर विश्वास ठेवला नाही.

नगेन्द्राचा निरुपाय झाला आहे असें पाहून एकजण म्हणाला, " कलकत्याला शामबाजारांत हिची मावशी रहाते. हिच्या मावशाचं नांव विनोद घोष. आपण तिकडेच जात असाल तर हिला बरोबर नेऊन मावशीच्या स्वाधीन करा. "

नगेन्द्राला तें पटलें. त्यानें कुंदेला बोलावणें पाठवलें. चंपा कुंदेला घेऊन आली. दुरूनच नगेन्द्राकडे पहातांच कुंद एकदम स्तंभित होऊन उभी राहिली. तिचें पाऊल पुढें पडेना असें पाहून चंपेनें विचारलें, " उभी कां राहिलीस ? "

नगेन्द्राकडे बोट दाखवून कुंद म्हणाली, " तोच हा ! आईनं काल आकाशांत दाखवला तोच हा. " तें ऐकून चंपाही साशंक होऊन थांबली.

त्या मुली पुढें येत नाहींत असें पाहून नगेंद्र स्वतःच पुढें झाला आणि गांवच्या लोकांबरोबर झालेलें सारें भाषण त्यानें कुंदला सांगितलें. कुंदेनें त्यावर मुळींच उत्तर दिलें नाहीं. डोळे तारवटून ती नगेंद्राकडे पहात स्तब्ध होऊन राहिली होती.

● ●

## —: ५ :—

● **कुन्देला** घेऊन नगेन्द्रनाथ कलकत्त्याला आला. तिथें येतांच त्यानें कुंदेच्या मावशीचा पुष्कळ तपास केला. शामबाजारांत विनोद घोष नांवाचा कुणीच माणूस रहात नव्हता. एक विनोद दास होता पण त्याचें तिचें कांहीं नातें नव्हतें. अर्थात् नगेंद्रालाच कुंदेचा भार पत्करावा लागला.

नगेंद्राची एक धाकटी बहीण होती. तिचें नांव होतें कमलमणी. तिची सासुरवाडी कलकत्त्यालाच होती. तिचा नवरा श्रीशचन्द्र मित्र एका बड्या विलायती कंपनींत मोठा अधिकारी होता. नगेंद्राची आणि त्याची मोठी दोस्ती होती. कुंदनंदिनीला घेऊन नगेंद्र बहिणीच्या घरीं गेला आणि त्यानें तिची सर्व हकीकत त्याला सांगितली.

कमलचें वय होतें अठरा वर्षें. ती दिसायला होती नगेंद्रासारखीच. दोघेंही बहीण भावंडें फार सुंदर होतीं. कमल चांगली सुशिक्षित होती. नगेंद्राच्या बापानें एक इंग्रज बाई शिकवायला ठेवून कमलमणी आणि सूर्यमुखी या दोघींनाहीं शिकवून चांगलें सुशिक्षित केलें होतें. कमलेची सासू हयात होती, पण ती आपल्या गांवीं रहात होती. कलकत्त्याच्या घरांत कमलच घरची मालकीण होती.

कुन्देची हकिकत सांगून झाल्यावर नगेंद्र बहिणीला म्हणाला, "आतां तूं हिला पदरांत घेतलं नाहींस तर हिला दुसरा आधार नाहीं. उद्यां तूं हिला इथं ठेवून घे अन् जायच्या वेळेला मी हिला गोविंदपूरला घेऊन जाईन."

कमलमणी खट्याळ मुलगी होती. नगेंद्र जातांक्षणींच तिनें कुंदेला जवळ कवटाळून घेऊन न्हाणीघरांत नेलें आणि तिथल्या गरम पाण्याच्या टबांत तिला लोटून दिलें. कुंद फारच घाबरली. हंसत हंसत कमलनें एक साबण हातांत घेऊन तिचें अंग चोळायला सुरवात केली. कमल स्वतः हें काम करते आहे असें पाहून एक दासी धांवत धांवत आली होती, तिच्या अंगावर गरम पाणी फेंकून तिनें तिला घालवून दिलें.

कमलनें स्वतःच्या हातांनीं तिला चांगलें स्नान घातलें तेव्हां ती शिशिरांतल्या कमळासारखी प्रसन्न झालेली दिसली. कुंदेला तिनें नवी पांढरी साडी नेसवली, तेल लावून तिचे केस विंचरून वेणी घातली आणि लहानमोठे दागिने

तिच्या अंगावर घालून ती म्हणाली, " जा, दादाबाबूला प्रणाम करून ये. अन् असं पहा, या घरच्या बाबूंना मात्र प्रणाम करूं नकोस—मोठे वाईट आहेत ते—तुला पहातांच लग्न लावून टाकतील तुझ्याबरोबर. "

नगेन्द्रनाथनें सूर्यमुखीला ही सर्व हकीकत कळवली. हरदेव घोषाल नांवाचा त्याचा एक जिवलग मित्र दूर देशीं रहात होता—नगेन्द्रानें त्याला पत्र लिहिलें तें असें:—

" आतां तूंच सांग, कोणत्या वयांत स्त्री सुंदर दिसते ? तूं म्हणशील चाळीसाव्या वर्षी, कारण तुझ्या ब्राह्मणीला तितकींच वर्षें होऊन गेलीं आहेत. कुंद नामक ज्या मुलीची हकीकत मी तुला लिहिली आहे तिचं वय आहे तेरा वर्षं. तिला पहातांच वाटलं, कीं सुंदर दिसायचं वय हेंच. मोठी सरळ आहे ती मुलगी. आजसुद्धां शेजारच्या मुलांबरोबर ती खेळत असते अन् जरब दाखवली तर एकदम भिऊन परत येते. कमल तिला लिहावाचायला शिकवते आहे. ती शिकते आहेही मोठ्या हौसेनं. तिचे निळे निळे डोळे मोठे सुंदर आहेत. कांहीं न बोलतां ती माझ्याकडे पहात रहाते तेव्हां मीही क्षणभर अस्वस्थ होतों. तें ऐकून कदाचित तुला हंसूं येईल, पण तूं सुद्धां जर ते डोळे पाहिले असतेस तर तुझीही अवस्था माझ्यासारखीच झाली असती. दर खेपेला तिच्या डोळ्यांत वेगळीच चमक दिसते —जणूं काय ती नजर या लोकींची नव्हे ! ती सुंदर आहे, पण तें सौंदर्य असं आहे, कीं त्याची कुणाशींही तुलना होणार नाहीं. तुलनेला शब्दच सांपडत नाहींत. ती अगदीं शांत आहे—शरदृतूंतल्या चन्द्राचे किरण सरोवरांत पडले म्हणजे जो भाव व्यक्त होतो त्याच्याशींच तिच्या वृत्तीची तुलना करतां येईल—"

नगेन्द्रनें सूर्यमुखीला जें पत्र लिहिलें होतें त्याचें उत्तर आलें तें असें—

" दासीनें आपल्या पायांपाशीं कोणता अपराध केला तें कळत नाहीं. इतके दिवस जर कलकत्त्याला राह्यचें मनांत होतें तर सेवेसाठीं मी कां येऊं नये ? हुकूम झाला तर लगेच येईन. एक मुलगी कुठून तरी आणली म्हणून माझा विसर पडला का ? सारेच कोंवळे जिन्नस माणसाला

आवडतात. कोंवळा नारळ मिष्ट लागतो. मी आतां जून झालेंय-- नाहींतर ती बालिका मिळतांच कां तुम्हीं मला विसरलां असतां ?

"थट्टा राहूंदे—तुम्हीं या मुलीवरची मालकी सोडून का दिली आहे? नाहींतर ती मी तुमच्यापासून मागून घेतली असती. वास्तविक तुमच्या प्रत्येक वस्तूवर माझा हक्क असायचा—पण आजकाल पहातेंय तुमची बहिणच सत्ता गाजवतेय तुमच्यावर.

" काय करायचं आहे या मुलीशीं ? मी तिचं ताराचरणबरोबर लग्न लावून देतें. त्याच्यासाठीं मी मुलगी शोधीत होतें, आतां ही आयतीच चालून आली आहे, तेव्हां मला निराश करूं नका. कमलनें तिला मोकळीक दिली तर येतांना घेऊन या. मी कमललाही लिहिलं आहे. दागिने घडवून लग्नाची सर्व तयारी करायच्या उद्योगाला मी लागलें आहें. कलकत्याला फार दिवस राहूं नका. कलकत्त्याला सहा महिने राहिला तर माणूस गाढव बनतो. कुंदबरोबर स्वतःच लग्न करायचा तुमचा विचार असला तर मला तसं सांगा, मी मांडव घालायच्या तयारीला लागतें."

ताराचरणची हकीकत पुढें येईल—पण एवढें खरें, कीं सूर्यमुखीचा हा प्रस्ताव नगेन्द्र आणि कमलमणी या दोघांनाही पटला. अर्थात् गांवीं जातांना नगेन्द्रनें कुंदेला बरोबर न्यावें असें ठरलें. कमलनें कुंदेसाठीं कांहीं दागिनेही करायला दिले.

योगायोग असा होता, कीं या प्रस्तावाला संमति दिल्याबद्दल त्या दोघां बहीण-भावांना रडायचा प्रसंग येणार होता. कमलमणी, सूर्यमुखी आणि नगेन्द्र या तिघांनीं मिळून या विषबीजाचें रोपण केलें होतें. पुढें या तिघांनाही हाहाःकार करण्याचा प्रसंग येणार होता.

कुंदेला घेऊन नगेन्द्र आपल्या नौकेंतून गोविंदपूरला जायला निघाला. कुंद आपलें स्वप्न जवळ जवळ विसरून गेली होती. नगेन्द्रच्या बरोबर निघतांना तिला एकदां त्या स्वप्नाची आठवण झाली होती, पण त्याची कारुण्यपूर्ण मुद्रा आणि आजवर पाहिलेलें त्याचें लोकवत्सल चरित्र ध्यानीं येतांच त्याच्या हातून आपलें अनिष्ट होईल ही कल्पनासुद्धां तिला खरी वाटेना.

कांहीं कांहीं माणसें अशीं पतंगवृत्तीचीं असतात, कीं जळती खाई समोर दिसली तरी तींत उडी घ्यायला त्यांना संकोच वाटत नाहीं.

• •

## —: ६ :—

• कवि कालिदासाची एक माळीण होती. ती रोज त्याला फुलें पुरवीत असे. कालिदास दरिद्री ब्राह्मण—फुलांचें मोल त्याला देतां येत नसे—मोबदला म्हणून तो आपण रचलेलीं काव्यें त्या माळणीला ऐकवी. एके दिवशीं त्या माळणीला एका तळ्यांत एक अपूर्व असें कमळ फुललेलें दिसलें. माळणीनें तें आणून कालिदासाला दिलें. मोबदल्यादाखल कवीनें आपलें मेघदूत काव्य तिला ऐकवलें. मेघदूत म्हणजे सुंदर काव्य—पण त्यांतल्या पहिल्या पहिल्या कांहीं कविता नीरस आहेत, त्या माळणीला त्या आवडल्या नाहींत. ती उठून चालूं लागली तेव्हां कवीनें विचारलें, " कां चाललीस ? "

माळीण म्हणाली, " तुमच्या कवितेंत रस नाहीं. "

कवी म्हणाला, " माळणी, स्वर्गाला जाणं तुला शक्य होणार नाहीं. स्वर्गाला जायला सोपान आहेत. लक्ष योजनं सोपान चढून जावं तेव्हां कुठं स्वर्ग गांठतां येतो. माझ्या मेघदूतालाही असाच स्वर्गाचा सोपान आहे—या नीरस कविता म्हणजेच तो सोपान—हा सामान्य जिना चढून जर तुला जातां आलं नाहीं, तर लक्ष योजनांच्या पायऱ्या तूं चढून जाणार कशी ? "

ब्राह्मणाच्या शापानें हातचा स्वर्ग जाईल या भीतीनें माळणीनें मेघदूत काव्य अथपासून इतिपर्यंत ऐकून घेतलें आणि मग मात्र ती खूष झाली. दुसऱ्याच दिवशीं मदनमोहिनी नांवाची एक विचित्र माळा गुंफून तिनें ती कविराजाला अर्पण केली.

आमचें हें सामान्य काव्य! स्वर्गही नाहीं, कीं याला लक्ष योजनांचा जिनाही नाहीं. रसही बेताबाताचा आणि जिनाही छोटाच. हीं पहिलीं नीरस प्रकरणें म्हणजे तो जिना. माळणीसारखे कुणी असतील त्यांना मला एवढेंच सांगायचें, कीं तुम्हाला यांतल्या रसाचा आस्वाद इतक्यांत मिळणार नाहीं.

सूर्यमुखीचें माहेर होतें कोननगरला. कलकत्त्याला एका विलायती कंपनींत

तिचा बाप कॅशिअर होता. सूर्यमुखी त्या गृहस्थांची एकुलती एक मुलगी. ती लहान असतांना श्रीमती नांवाच्या एका त्यांच्याच जातीच्या विधवा दाईनें सूर्यमुखीला लहानाचें मोठें केलें होतें. श्रीमतीला एक लहान मुलगा होता. त्याचें नांव ताराचरण. तो सूर्यमुखीचा समवयस्क होता. लहानपणीं तीं दोघेंही एकाजागीं खेळलीं वाढलीं होतीं, त्यामुळें त्या दोघांच्याही मनांत भाऊ बहिणीचें प्रेम निर्माण झालें होतें.

श्रीमती देखणी होती—विधवा होती—तरूण असल्यामुळें तिचें पाऊल वांकडें पडलें. गांवांतल्या एका दुश्चरित्र श्रीमंत माणसाची नजर तिच्यावर गेल्यामुळें, सूर्यमुखीच्या बापाचें घर सोडून ती निघून गेली. ती कुठें गेली तें कुणाला कळलें नाहीं कीं ती गांवींही परत आली नाहीं.

ताराचरणाला टाकून श्रीमती गेली होती. तो सूर्यमुखीच्या बापाच्या घरींच राहिला. सूर्यमुखीचा बाप मोठा दयाळू माणूस होता. त्यानें आपल्या मुलाप्रमाणेंच त्याचा प्रतिपाळ केला. त्याला नोकरासारखा न वागवतां चांगलें शिक्षण दिलें. एका मिशनरी स्कूलमध्यें तो शिकूं लागला.

कांहीं काळानें सूर्यमुखीचें लग्न झालें. त्यानंतर कांहीं वर्षांनीं तिचा बाप स्वर्गवासी झाला. तोंपर्यंत ताराचरणचें सर्वसाधारण इंग्रजी शिक्षण झालें होतें, पण त्याला कुठें नोकरी मिळाली नव्हती. तो सूर्यमुखीच्या बापाच्या घरींच राहिला होता.

नगेन्द्राला सांगून सूर्यमुखीनें गांवांत एक शाळा उघडली. ताराचरण त्या शाळेंत मास्तर म्हणून नेमला गेला. गांवांत त्यामुळें त्याची प्रतिष्ठा वाढली. विशेषतः त्यानें Citizen of the world आणि Spectator वाचला होता. त्याचीं जॉमेट्रीचीं तीन बुकें झालीं होतीं, असेंही चोंहीकडे बोललें जात होतें.

या साऱ्या कर्तबगारीमुळें तो देवीपूरचे जमीदार देवेंद्रबाबू यांच्या ब्राह्मसमाजांत शिरला आणि थोड्याच काळांत बाबूजींचा उजवा हात बनला. समाजाच्या सभेंत प्रत्येक आठवड्याला तो विधवाविवाह, स्त्रीशिक्षण, मूर्तिपूजा वगैरे विषयांवर निबंध लिहून वाचून दाखवीत असे. आणि व्याख्यानाची सुरवात ‘ हे परम कारुणिक परमेश्वरा ! ’ असें म्हणून करून लांबलांब व्याख्यानें देत असे. ही व्याख्यानें बहुतेक तो ‘ तत्वबोधिनी ’ मासिकांतल्या

लेखांची नक्कल करून तयार करीत असे, किंवा शाळेंतल्या पंडितांकडून तीं लिहून घेत असे. तो सदोदित म्हणत असे, "दगडा धोंड्याची पूजा करणं सोडा. प्रौढ विधवांचीं लग्न लावून द्या. मुलींना सुशिक्षित करा. त्यांना पिंजऱ्यांत कां कोंडून ठेवतां ? बायकांना एकदां बाहेर येऊं दे."

बायकांच्या संबंधीं एवढी उदार मतें प्रदर्शित करायला तो प्रवृत्त होत असे तो त्याच्या घरांत कुणी बायकोमाणूस नव्हतें म्हणून. अजून त्याचें लग्न झालें नव्हतें. त्याच्या लग्नासाठीं सूर्यमुखी पुष्कळ खटपट करीत होती, पण त्याच्या आईच्या चारित्र्याबद्दल गोविंदपुरांत फार आरडाओरडा झालेला असल्यामुळें कुठलाही सभ्य कायस्थ माणूस त्याला मुलगी द्यायला तयार नव्हता. तसेंच जे अर्धवट होते, त्यांच्या मुली काळ्या किंवा कुरूप होत्या. सूर्यमुखी ताराचरणला पाठच्या भावाच्या नात्यानें मानीत असल्यामुळें असल्या लोकांच्या असल्या मुलींना भावजयी करून घ्यायची तिची तयारी नव्हती. ती अशा अडचणींत असतांना कुन्दनंदिनीच्या रूपगुणाचें वर्णन केलेलें नगेंद्रचें पत्र आल्यामुळें तिचें लग्न ताराचरणशीं करून द्यायचें तिनें ठरवून टाकलें.



## —: ७ :—

**नगेंद्राबरोबर** कुंदनंदिनी गोविंदपूरला आली. नगेंद्राचें घर पाहून ती थक्क होऊन गेली. एवढें मोठें घर तिनें कधीं पाहिलें नव्हतें. त्या घराला आंत आणि बाहेर असे तीन तीन चौक होते. त्या चौकांत प्रवेश करायला मोठमोठे दरवाजे होते. फाटकांतून आंत यायला सुंदरसा लाल विटांचा रस्ता तयार केलेला होता. समोरच भला मोठा दोन मजली बैठकखाना होता. त्याचा जिनाही तसाच भला मोठा होता. आंतलें सामानही बहुमोल होतें. या पहिल्या चौकांत कचेरी होती. तिच्या मागल्या बाजूला उत्सवाच्यासाठीं पूजेचें घर होतें. त्याच्या बाजूला दुमजली चबुतरे होते आणि मध्यें अंगण होतें. उत्सवाच्या वेळेशिवाय या ठिकाणीं कुणाची वस्ती नसे. घरांत जिकडेतिकडे माणसांचा गजबजाट सुरू होता.

या चौकाच्या मागें बायकांचा चौक होता. त्यांतल्या एक भागांत नगेन्द्र,

त्याची बायको आणि त्यांचे खास नोकर तेवढेच रहात. हा विभाग स्वतः नगेन्द्रानें बांधून वाढवून घेतला होता. त्याच्याच बाजूला पूजेच्या मंदिराच्या मागल्याबाजूला अंतर्महाल होता. तो जुन्या पद्धतीचा होता. त्यांत नात्या-गोत्याच्या माणसांचा भरगच्च भरणा होता. आत्या, मावशी, मावशीची बहीण, आत्याची विधवा मुलगी, मावशीची सधवा मुलगी, आत्याच्या भावाची बायको, मावशीच्या भावाची मुलगी अशा साऱ्या माणसांनीं तें घर गजबजून गेलेलें होतें.

या अंतर्महालाच्या पलिकडे एक मोठा बगीचा होता. त्या बगीच्याच्या पलीकडे एक मोठा तलाव होता. त्या तलावाच्या चोहींबाजूला भिंती होत्या. या बगीच्यामधूनच मागील दरवाजाचा रस्ता गेला होता. याच रस्त्यानें बायका-मंडळीची यातायात होत असे.

वाड्याच्या बाहेरच्या बाजूला हत्तीशाळा, घोडशाळा, गोशाळा, कुत्र्यांचें घर, चिडियाखाना वगैरे वेगवेगळीं घरें होतीं. तीं सारीं पहात पहात कुंद-नंदिनी मेण्यांतून उतरून अंतःपुरांत आली. सूर्यमुखी समोर येतांच तिनें तिला प्रणाम केला आणि सूर्यमुखीनें तिला आशीर्वाद दिला.

नगेन्द्राची भेट झाली त्यावेळीं स्वप्नांत पाहिलेल्या पुरुषाचें साम्य त्याच्याशीं दिसल्यामुळें तिला वाटलें होतें, कीं जी स्त्रीमूर्ति तिला स्वप्नांत दिसली तशीच त्याची पत्नी असावी. सूयमुखीला पहातांच तिचा संशय मावळला. स्वप्नांत पाहिलेल्या स्त्रीप्रमाणें ती सांवळ्या वर्णाची नव्हती. ती अगदीं गोरी गोरी पान होती. तिचे डोळे मोठे सुंदर होते. भुवया रेंखीव होत्या. तिचें एकंदर ठाणमाण मोठें रेंखीव होतें. स्वप्नांत पाहिलेली स्त्री ठेंगणी होती, तर सूर्यमुखी चांगली उंच होती. स्वप्नांतल्या स्त्रीचें वय फार तर विशींतलें असावें—सूर्यमुखी चांगली पंचविशी उलटलेली होती. स्वप्नांतल्या मूर्तीशीं सूर्यमुखीचें कांहीं साम्य नाहीं असें दिसून आल्यामुळें कुंदेचा जीव खालीं पडला.

सूर्यमुखीनें कुंदेला गोड गोड बोलून बसवून घेतलें अन् तिच्या सेवेला दासी नेमून दिल्या. तिनें मुख्य दासीला सांगितलें, "ही कुंदनंदिनी. माझा भाऊ ताराचरण याच्याबरोबर हिचं लग्न व्हायचंय—तेव्हां माझ्या भावजयीला शोभेशी हिची बरदास्त ठेव."

त्या दासीनें कबुली दिली. कुंद त्या दासीकडे सारखी पहात राहिली होती.

तिला पहातांच कुंदेच्या अंगावर कांटा उभा राहिला. ती नखशिखांत घामानें भिजून गेली—

स्वप्नांत दिसलेल्या स्त्रीशीं त्या दासीचें साम्य पाहून ती घाबरून गेली होती. कुंदेनं घाबऱ्याघुबऱ्या चांचरत तिला विचारलें, " कोण ग तूं ? "

दासी म्हणाली, " माझं नांव हिरा. "



—: ८ :—

**कुंदनंदिनीला** घेऊन नगेंद्र घरीं आल्यानंतर थोड्याच दिवसांनीं तिचें ताराचरणबरोबर लग्न झालें. ती सुंदर स्त्री घेऊन ताराचरण आपल्या घरीं गेला, पण स्त्री सुंदर असल्यामुळें तो मोठ्या पेंचांत पडला होता.

आजवर त्यानें स्त्रीशिक्षण आणि पडदापद्धति मोडण्याच्या बाबतींत लंबीं-चौडीं व्याख्यानें दिलीं होतीं. हीं व्याख्यानें देवेंद्रबाबूंच्या बैठकखान्यांत होत असत. या विषयाच्या बाबतींत ज्यावेळीं चर्चा सुरू होई त्यावेळीं ताराचरण-मास्तर छाती फुगवून म्हणत असे, " ज्यावेळीं मला हा योग येईल त्यावेळीं या बाबतींत reform करून दाखवण्याचं पहिलं काम मी करीन. माझं लग्न झालं, कीं पहिल्यानं मी माझ्या बायकोला घेऊन या सभा-संमेलनांत भाग घेईन. "

आतां तर त्याचें लग्न झालें होतें. कुंदेच्या सौंदर्याची ख्याती त्याच्या दोस्तांच्या कानांपर्यंत जाऊन पोंचली होती. सगळे दोस्त तोंड वेंगाडून जुनें गाणें म्हणत, " कुठं गेली ती प्रतिज्ञा ? "

देवेंद्र म्हणे, " काय रे ? तूं देखील त्या ओल्ड फूल्सच्या टोळक्यांत सामि झालास का ? आपल्या बायकोबरोबर आमचा परिचय केव्हां करून देणार आहेस ? " तें ऐकून ताराचरण ओशाळून जात असे. देवेंद्रबाबूंचे उद्गार त्याच्या मनाला लागत असत. त्याचें मागणें कबूल करणें त्याला कठीण जात होतें, तरीही कुंदनंदिनीला त्या बैठकखान्यांत घेऊन यायचें त्यानें पहिल्यानें कबूल केलें.

तरीही तो भीत होता—सूर्यमुखीला कळलें तर ती रागें भरेल. अशा

रीतीनें टाळाटाळ करीत त्यानें एक वर्ष जाऊं दिलें. या पुढें टाळाटाळ करणें शक्य नाहीं असें पाहून घर दुरुस्त करण्याचें निमित्त करून त्यानें कुंदनंदिनीला नगेंद्राच्या घरीं पोंचतें केलें. घर दुरुस्त झालें. पुन्हां ती घरीं आली. एके दिवशीं देवेंद्र सारें टोळकें गोळा करून ताराचरणच्या घरीं येऊन हजर झाला. सर्वांनीं त्याच्यावर भडिमार करायला सुरवात केली. त्याच्यावर ते दांभिकपणाचा आरोप करूं लागले तेव्हां त्याचा नाइलाज झाला. त्यानें कुंदनंदिनीला समजावून दिवाणखान्यांत बोलावून घेतलें आणि देवेंद्राशीं तिचा परिचय करून दिला.

बिचारी कुंद देवेंद्राबरोबर काय बोलणार होती ? कांहीं वेळपर्यंत ती पदर पुढें ओढून उभी राहिली आणि नंतर रडत रडत पळून गेली. तेवढ्यांत तिचा नूर देवेंद्रानें पाहिला, त्यामुळें तो मुग्ध होऊन गेला होता. कुंद त्याच्या नजरेसमोर सारखी दिसूं लागली होती.

यानंतर कांहीं दिवसांनीं देवेंद्राच्या घरीं कसलातरी समारंभ होता. त्या समारंभाचें आमंत्रण देण्यासाठीं एक मुलगी कुंदेच्या घरीं आली. तें कळतांच सूर्यमुखीनें कुंदेला देवेंद्राकडे जायची बंदी केली. अर्थात त्यावेळीं तिचें जाणें झालें नाहीं. त्यानंतर आणखी एकदां देवेंद्र ताराचरणच्या घरीं आला आणि कुंदेबरोबर चार शब्द बोलायची संधी साधून निघून गेला. ती बातमी सूर्यमुखीच्या कानीं गेली. तिनें ताराचरणला बोलावून घेतलें आणि त्याची चांगलीच हजेरी घेतली. तेव्हांपासून कुंदनंदिनी आणि देवेंद्र यांची दृष्टभेटसुद्धां होणें अशक्य झालें.

लग्नानंतर अशा प्रकारें तीन वर्षें गुदरलीं. त्यानंतर कुंदनंदिनी विधवा झाली. विषमज्वरानें ताराचरण मरण पावला. सूर्यमुखीनें कुंदेला आणवून आपल्या घरीं ठेवून घेतलें. ताराचरणला तिनें जें घर दिलें होतें तें विकून टाकून त्याचा पैसा कुंदेच्या नांवें करून दिला.

• •

## —: ९ :—

• **विधवा** कुंदनंदिनी नगेंद्राच्या घरीं कांहीं दिवस राहिली होती. एके दिवशीं दुपारीं गांवच्या बऱ्याच बायका जुन्या अंतःपुरांत जमा झाल्या होत्या.

बायकांच्या जातीप्रमाणें ज्या त्या आपआपसांत कुणाची निंदा तर कुणाची स्तुति करीत गांवच्या उखाळ्या पाखाळ्या काढीत होत्या. इतक्यांत एक वैष्णवी 'जय राधे' म्हणत त्या मेळाव्यांत हजर झाली.

नगेंद्राच्या पाहुणेघरांत दर रविवारीं भिकाऱ्यांना तांदूळ वाटीत असत. भिकारी यायचे म्हणजे त्या बाजूला. पण ही अंतःपुरांत आली असें पाहून एकजण म्हणाली, "कोण ग मेली ती आली आहे इकडे आंत? तिकडे जा पाहुणेघरांत." असें म्हणतांना तिची नजर त्या वैष्णवीकडे गेली, त्याबरोबर ती उद्गारली, "अगबाई! कुठली ग ही वैष्णवी?"

त्या वैष्णवीला पहातांच साऱ्या चकित झाल्या. ती अत्यंत सुंदर होती. कुंदनंदिनीखेरीज इतकी सुंदर स्त्री तिथें आसपास कुठें दिसली नव्हती. बारकाईनें पहाणाऱ्याला तिच्या सौंदर्यांत एक प्रकारचा मर्दानीपणा दिसून आला असता.

एकीनें तिला ती कुठली म्हणून विचारलें तेव्हां ती म्हणाली, "माझं नांव हरिदासी वैष्णवी. तुम्ही गाणं ऐकणार का माझं?" असें म्हणून ती हातीं खंजरी घेऊन तिथें बैठक मारून बसली. कुंदेला गाण्याची फार आवड होती. ती गाणार असें पाहून ती येऊन तिच्याजवळ बसली.

वैष्णवीनें विचारलें, "काय म्हणूं?" प्रत्येकजण आपापल्या आवडीचें गाणें म्हणायला सांगत होती. एकीनें तर तिला निधूचे टप्पेच म्हणायला सांगितलें. ती वैष्णवी कुंदेकडे वळून म्हणाली, "काय हो, तुम्ही कांहीं फर्माईश करीत नाहीं?"

कुंद लाजली, थोडीशी हंसली, पण तिला सरळ न सांगतां तिथल्या एका प्रौढ स्त्रीच्या कानाला लागून म्हणाली, "तिला कीर्तन म्हणायला सांगा."

सर्वांची फर्माईश हिशेबीं न घेतां तिनें खंजरीवर बोट मारलें आणि सूर धरला. तिनें कीर्तन गायला सुरवात केली. संगीतविद्येंत या अल्पवयांतही ती चांगली निष्णात असावी असें दिसून आलें. बराच वेळपर्यंत ती जीव तोडून गात होती. गाणें संपलें तेव्हां ती कुंदेकडे पाहून म्हणाली, "गाऊन गाऊन माझा गळा सुकलाय. मला थोडं पाणी प्यायला द्या."

कुंदेनें पाणी भरलेलें भांडें आणून तिच्यासमोर ठेवलें तेव्हां वैष्णवी म्हणाली, "तुमच्या भांड्याला मी कशी शिवूं ? माझ्या ओंजळींत पाणी ओता."

सर्वांनीं कल्पना केली ती पूर्वीची कुणीतरी अस्पृश्य असावी आणि आतां तिनें वैष्णवांची दीक्षा घेतली असावी. ती वैष्णवी ओटी उतरून बरीच पलिकडे गेली. त्या बाजूला कुणीच नव्हतें. कुंद ओटीवर उभी राहून तिच्या ओंजळींत पाणी ओतीत होती. हात तोंड धूतांना वैष्णवी हळुच खालच्या आवाजांत म्हणाली, " तूं कुंदच ना ? "

" कां ग ? " कुंद चकित होऊन म्हणाली.

" तुझी सासू कधीं पाहिली आहेस तूं ? " वैष्णवीनें विचारलें.

कुंद म्हणाली, " नाहीं. " तिची सासू भ्रष्ट होऊन गांव सोडून परागंदा झाली होती असें तिनें ऐकलें होतें.

वैष्णवी म्हणाली, " तुझी सासू इथं आली आहे. ती माझ्या घरीं आहे. तुला पहायसाठीं जीव टाकते आहे. कांहीं झालं तरी ती तुझी सासूच ना ? बिचारी इथं येऊन इथल्या कुणाला कशी तोंड दाखवील ? काय ? माझ्या बरोबर येतेस तिला भेटायला ? "

कुन्द सरळस्वभावी असली तरी तिला लोकरीती कळत होती. तिनें मान हालवून नकार जाणवला. वैष्णवी खनपटीला बसली होती. परोपरीनें तिला विनवीत होती. कुन्द म्हणाली, " घरवालीला विचारल्याशिवाय मला येतां यायचं नाहीं. "

" छे छे ! त्यांना सांगूं नकोस. " वैष्णवी म्हणाली, " त्या तुला जाऊं द्यायच्या नाहींत. कदाचित तुझ्या सासूलाच आणायला कुणाला तरी पाठवतील अन् मग ती गांव टाकून पळून जाईल. "

वैष्णवीनें परोपरीनें समजूत घालायचा प्रयत्न केला तरी सूर्यमुखीची सम्मति घेतल्याशिवाय कुन्द जायला तयार होईना. शेवटीं हरिदासी म्हणाली, " बरं तर. तूं विचारून ठेव त्यांना. मी अशीच केव्हांतरी येईन अन् तुला घेऊन जाईन. पण हें पहा, जरा सजवून गुजवून बोल—थोडीशी रडून कढून पहा—नाहींतर हें कांहीं जमायचं नाहीं. "

कुंदेला तें पटलें नव्हतें. तिनें वैष्णवीला कांहींच उत्तर दिलें नाहीं. पाणी पिऊन झाल्यावर हरिदासी पुन्हां बायकांच्या मेळाव्यांत आली आणि बक्षिस मागूं लागली. तितक्यांत सूर्यमुखी तिथें आली. तेव्हां एकदम बायकांची बडबड बंद झाली. ज्या त्या कुठल्या ना कुठल्या कामाला लागल्या.

वैष्णवीला नीट निरखून पाहून सूर्यमुखीनें विचारलें, " कोण ग तूं ? "

तेव्हां एक दासी म्हणाली, " ती वैष्णवी आहे. फार सुंदर गाते. असलं गाणं ऐकायला मिळणं दुर्लभ ! आपल्याला ऐकायचं आहे का ? गा ग वैष्णवी. "

हरीदासीनें एक शामगीत म्हटलें तेव्हां सूर्यमुखी खूष झाली आणि तिनें तिला बक्षीस दिलें आणि निरोप दिला. वैष्णवीनें सूर्यमुखीला प्रणाम केला आणि हळुच चोरून कुंदेला डोळ्यांनीं खूण करून ती निघून गेली. सूर्यमुखी नजरेआड होतांच तिनें जातां जातां एक शृंगारिक गीत म्हणायला सुरवात केली.

ती वैष्णवी निघून गेल्यावर जमलेल्या बायकांत तिचीच विचक्षणा चालली होती. पहिल्यानें सर्वांनीं तिची तोंड भरून स्तुती केली. नंतर हळुहळु एकेकजण तिच्या खोडी शोधून काढूं लागल्या. एकजण म्हणाली, " तशी दिसतेय बरी, पण नाक जरा चपटं आहे. "

दुसरी म्हणाली, " आहे गोरी, पण अगदींच फटफटीत दिसते. "

तिसरी म्हणाली, " तसे केंस बरे आहेत तिचे, पण अगदीं घोड्याच्या शेपटीसारखे. "

कुणी म्हणत होती कीं, कपाळ पाथरीसारखें—तर कुणी म्हणत होती ओठ शिंप्यासारखे—तर कुणी म्हणत होती, " मेलीची कंबर आहे मृदंगासारखी ! "

एकजण म्हणाली, " दिसायला कशी कां असेना पण मेली गाते छान ! "

दुसरी म्हणाली, " म्हैशीसारखी रेकतेय. "

तिसरी म्हणाली, " मेलीला तालच कळत नाहीं. "

तात्पर्य काय, वैष्णवी सुरवातीला सुंदर होती ती शेवटीं कुरूप ठरली आणि तिचें गाणें अगदींच बेसुर आणि बेताल ठरलें.

● ●

## —: १० :—

**हरिदासी** वैष्णवी दत्तबाबूंच्या घरांतून बाहेर पडली ती देवीपूरकडे वळली. देवीपुरांत लोखंडी कठडा असलेला एक मोठा बगीचा होता. त्यांत तऱ्हेतऱ्हेचीं फुलझाडें आणि फळझाडेंही होतीं. त्या बागेच्या मध्यभागीं एक तलाव होता आणि त्यावर एक बैठकखाना उभारलेला होता. हरिदासी त्या बगीच्यांत आली आणि त्या वरच्या बैठकखान्यांत प्रवेश करून एका बाजूच्या खोलींत गेली. तिनें डोक्याचा टोप काढून ठेवला. हातांतले वाळे बांगड्या तिनें काढून टाकल्या. कपाळावरचे टिळे पुसून टाकले आणि स्त्रीवेष टाकून एक सुंदर पुरुष तिथें उभा राहिला.

त्या तरुणाचें वय पंचविशीच्या आसपास असावें. त्याच्या चेहऱ्यावर केंस मुळींच नव्हते आणि त्याची मुद्रा अगदींच बालिश होती. त्या तरुणाचें नांव होतें देवेंद्रबाबू. त्याचा उल्लेख पूर्वी आला आहेच.

देवेंद्र आणि नगेन्द्र हे एकाच वंशांतले, पण या दोन्ही घराण्यांत वडिलोपार्जित वैर चालत आलें होतें. देवीपूरचे दत्तबाबू गोविंदपूरच्या दत्तबाबूंबरोबर भाषणसुद्धां करीत नसत. या दोन घराण्यांत कित्येक पिढ्या एक दावा चालला होता, तो नगेन्द्राच्या आजोबानें जिंकला आणि देवेंद्राचा आजोबा त्यामुळें दुबळा झाला. डिक्री जारी करतांना त्यांचें सर्वस्व गेलें, तें गोविंदपूरच्या दत्तांनीं लिलावांत हस्तगत केलें. इतक्या पिढ्या गेल्या तरी या दोन घराण्यांत कधींच समेट झालें नाहीं.

गणेशबाबू नांवाचे एक जमीदार हरिपूरला रहात असत. हैमवती ही त्यांची एकुलती एक मुलगी. तिच्याशीं देवेंद्राचें लग्न झालें होतें. हैमवती म्हणजे एक गुणी बाळ होतें.—ती कुरूप होती, तोंडाळ होती, भांडखोर होती आणि अत्यंत स्वार्थी होती. तिच्याशीं लग्न होईपर्यंत देवेंद्राच्या चारित्र्याला मुळींच डाग लागला नव्हता, पण या लग्नापायींच त्याचें दुर्दैव ओढवलें. स्वतःच्या घरांत सुखासमाधानाची आशा नाहीं असें पाहून तो बाहेरख्याली बनला. बगीच्यांत त्यानें हा बैठकखाना बांधला होता तो त्या भांडखोर बायकोपासून दूर रहातां यावें म्हणून. कलकत्त्यांत गेल्यापासून त्याला सर्व प्रकारचीं

व्यसनें लागलीं. बाहेरख्याली बरोबरच त्याला दारूचेंही व्यसन लागलें. ही सर्व कमाई घेऊन त्यानें बगीच्यांत वस्ती केली होती.

कलकत्त्यांत तो समाजसुधारक म्हणून मिरवीत होता. देवीपुरांत आल्यावर त्यानें तिथें ब्राह्मसमाजाची शाखा उघडली. ताराचरण प्रभृती बरेच ब्राह्मण त्याच्या टोळक्यांत आले. व्याख्यानांची झोड उडूं लागली. एक 'फीमेल हायस्कूल' उघडण्याच्या गोष्टी तो बोलत होता, पण त्यांतून कांहीं निष्पन्न झालें नाहीं. त्यांनी विधवाविवाहाची चळवळ सुरू केली होती. दोनचार खेडवळें गोळा करून त्यांच्यांतल्या विधवांची त्यानें लग्नें लावून दिलीं होतीं—अर्थात त्यांत कांहीं विशेष नव्हतें. पडद्याविरुद्धही त्यानें चळवळ चालवली होती. त्याचा इतिहास पूर्वी आलाच आहे.

देवेंद्र आपल्या दिवाणखान्यांत आला आणि त्यानें दारूच्या बाटल्या उघडून त्या खालीं करायला सुरुवात केली. खानसाम्यानें टोस्ट, मटन आणि गरमागरम कटलेट आणून त्याच्या समोर ठेवले.

हा सर्व विधी उरकून झाल्यावर आपले तंबोरे घेऊन गवय्ये बजवय्ये आले. नुकत्याच होऊन गेलेल्या सुरादेवीच्या पूजेला शोभेशीं गाणीं बजावणीं सुरू झालीं.

सर्वांच्या शेवटीं देवेंद्राचा मामेभाऊ सुरेंद्र आला. त्याचा स्वभाव आणि चारित्र्य देवेंद्राच्या अगदीं उलट असलें तरी देवेंद्राची त्याच्यावर फार मर्जी होती. तो कधीं कुणाचें ऐकत असेल तर तें या सुरेंद्राचेंच. रोज एकदा येऊन तो देवेंद्राची खबर घेऊन जात असे, पण त्यांच्या बैठकींत बसत नसे. सगळे दोस्त भगत उठून गेल्यावर सुरेंद्रानें देवेंद्राला विचारलें, "आज कशी काय आहे तुझी प्रकृती ? आज ताप आला होता कां ?" देवेन्द्र 'नाहीं' म्हणाला, तेव्हां त्यानें विचारलें, "आणि यकृताचं कसं आहे ?"

देवेन्द्र म्हणाला, "पूर्वीसारखंच."

"तर मग हें आतां कांहीं दिवस बंद ठेवलंस तर बरं नाहीं का ?"

"तें शक्य नाहीं." देवेन्द्र म्हणाला, "कशाला रोज रोज सांगतोस ! ही दारू म्हणजे माझी जन्माची सोबतीण आहे."

" जन्माची सोबतीण कशी ? " सुरेंद्र म्हणाला, " ती कांहीं तुझ्या बरोबर आली नाहीं. तुझ्याबरोबरही जाणार नाहीं. आजपर्यंत पुष्कळ गोष्टींचा तूं त्याग केलास—अब्रूचासुद्धां त्याग केलास—हा एवढा त्याग कां करीत नाहींस ? "

" कोणत्या सुखासाठीं हें सोडूं मी ? " देवेंद्र म्हणाला, " या आनंदाची भरपाई दुसऱ्या कुठंतरी झाली पाहिजे ना ? "

" तर मग जगलं पाहिजे म्हणून तरी ही दारू सोड. " सुरेंद्र म्हणाला.

" ज्यांना जगण्यांत सूख आहे ते जगायच्या आशेनं दारू सोडतील. " देवेन्द्र म्हणाला, " मला जगण्यांत काय लाभ आहे ? "

सुरेंद्राचे डोळे भरून आले. तें पाहून देवेन्द्रही गंहिवरला आणि म्हणाला, " मला सन्मार्गाला लावायची इच्छा धरणारा काय तो तूं एकटाच आहेस. जर कधीं मी दारू सोडली तर ती तुझ्यासाठींच ! आणखी—" क्षणभर थांबून तो म्हणाला, "—जर माझी बायको मेल्याचं मला कळेल तरच दारू सोडीन. एरव्हीं जगणं मरणं माझ्यालेखीं सारखंच आहे. "

हैमवतीला मनांतल्या मनांत लाख शिव्या मोजून सुरेंद्र भरल्या डोळ्यांनीं तिथून निघून गेला.

● ●

## —: ११ :—

● **सूर्यमुखीनें** पत्र लिहिलें होतें तें असें :—

" प्राणाधिका श्रीमती कमलमणी इजला :

" तुला आशीर्वाद म्हणून लिहिणें मला कठिण जातें. आतां तूं एका बड्या घरची गृहिणी झाली आहेस, असें जरी असलें तरी मी तुला माझी धाकटी बहीण म्हणूनच मानतें. तुला ' क ख ' शिकवलं मीच; पण माझं हें गिचमिड अक्षर तुझ्यासमोर ठेवायला मला लाज वाटते आहे, पण काय करणार ? वेळ तशीच वाईट आली आहे.

" कुणाला सांगायची गोष्ट नाहीं—सांगतांना वाईट वाटतं, तशीच शरमही वाटतें. पण मनांतलं दुःख तुझ्याखेरीज सांगायचं कुणाला ? तुझ्या भावाची गोष्ट तुझ्याखेरीज दुसऱ्या कुणाला सांगतां येत नाहीं.

" मीच माझं सरण रचलं आहे. कुंदनंदिनी उपाशी मेली असती तरी माझं काय खरचणार होतं ? देव इतक्या अनाथांची काळजी घेतो तशीच तिचीही काळजी त्यानं घेतली असती. मी हा चुडीनें वाघ घरांत कां आणला ? तूं तिला पाहिलीस तेव्हां ती अगदींच पोर-सवदा होती. आतां ती अठरा वर्षांची झाल्यामुळें भारीच सुन्दर दिसते. तिच्या सौंदर्यानेंच माझं वैर साधलं आहे.

" या जगांत माझं सुखाचं स्थान एकच—माझा पती. त्या माझ्या पतीच्या हृदयाची कुंदनंदिनी चोरी करते आहे. मला जर काय हवं असेल तर तें माझ्या पतीचं प्रेम, पण तेंहि कुन्दनंदिनी हिरावून घेऊं पहातेय.

" तुझ्या भावाला मी नांव ठेवीत नाहीं. त्याची निंदा करीत नाहीं. ते धर्मात्मे आहेत. त्यांचं चरित्र निष्कलंक आहे. मी रोज पहातें आहें, ते आपल्या मनाला आळा घालूं पहाताहेत. कुन्देकडे ते नुसते पहायचंसुद्धां चुकवतात. जरूरीशिवाय तिचं नांवसुद्धां घेत नाहींत. क्वचित तिच्याशीं त्यांचं वर्तन तुसडेपणाचं असतं.

" मग मी एवढी जीव टाकतें आहें कां ? कुणा पुरुषानं असं विचारलं असतं तर त्याला समजावून सांगतां आलं नसतं. तूं स्त्री आहेस. आतां तुझ्या लक्षांत आलं असेल. कुंदेकडे जर त्यांचा ओढा नसतां तर त्यांनीं तिच्याकडे दुर्लक्ष कां केलं असतं ?

" ते मनांतल्या मनांत चोर आहेत म्हणून मुद्दाम तुसडेपणाचं ढोंग करतात. हा राग तिच्यावर नव्हे. तो राग आहे स्वतःवर ! ती समोर दिसली नाहीं म्हणजे त्यांचे डोळे तिला धुंडित इकडे तिकडे तिला शोधूं लागतात. आणि दिसली कीं ते लगेच नजर वळवतात. असं कां करतात तें मला कळत का नाहीं ? आजवर त्यांची वृत्ती मोठी प्रसन्न असे—आत्तांच अशी भ्रमिष्ट कां झाली ? मी कांहीं बोललें तर त्याचा अर्थ ध्यानीं न घेतां उगीच ' हूं ' म्हणतात. एकदां मी रागारागानें म्हटलं, ' मी आतां जीव देतें ' त्यावेळीं देखील ते ' हूं ' म्हणाले. असं काय झालंय म्हणून मी विचारलं तेव्हां ते म्हणाले, ' कोर्टे नि दाव्यांच्या

दगदगीमुळें —” पण मला माहीत आहे, यापूर्वीं कोर्टी खटल्याच्या गोष्टी ते हंसतमुखानं बोलत असत.

“एक नवी दासी ठेवली आहे मी. तिचं नांव आहे कुमुद. कुमुदला हांक मारतांना त्यांच्या तोंडून चुकून ‘कुन्द’ म्हणून येतं अन् मग ते ओशाळतात. कां ओशाळावं त्यांनीं ?

“म्हणजे ते माझी उपेक्षा किंवा आबाळ करताहेत असं मुळींच नाहीं. उलट पूर्वींपेक्षां माझी जास्त काळजी घेतात. काळजी घेणं आणि प्रेम दाखवणं यांत मोठाच भेद आहे. आम्हा बायकांनाच तो कळतो.

“आणखी एक गम्मत. कलकत्त्यांत ईश्वर विद्यासागर नांवाचा एक मोठा पंडित आहे म्हणे! तो विधवांचीं लग्नं लावून देतो म्हणे! विधवेचं लग्न लावणारा तो जर पंडित, तर मग मूर्ख कोण? या विद्यासागरचीं पुस्तकं घेऊन रोज चर्चा चालत असते.

“मी माझ्याच कर्मकटकटी सांगून तुला त्रास देतेंय, पण काय करूं बाई? तुझ्याखेरीज कुणाला सांगूं? अजून माझ्या तक्रारी संपल्या नाहींत पण हें पत्र वाचतांनां तुझा चेहरा मला दिसतो आहे—म्हणून इथंच संपवतें. या सर्व गोष्टी कुणाला सांगूं नकोस—जांवईबाबूंनासुद्धां सांगूं नकोस. मला भेटायला येणार नाहींस का तूं? एकदां ये ना! तूं आलीस तर माझं दुःख तेवढंच हलकं होईल. तुझ्या मुलाची नि जांवईबाबूंची खुशाली कळव. इति!

सूर्यमुखी.”

**ता. क.** आणखी एक सांगायचं राहिलं—ही किरका घालवून दिली कीं सुटलें. कुठं घालवून देऊं? तुझ्याकडे का? कीं तुलाही भीती वाटते तिची?”

कमलचें उत्तर आलें तें असें:—

“तुला वेड लागलंय! नाहीं तर तूं आपल्या पतीवर असा अविश्वास कसा दाखवला असतास? तो विश्वास ढळूं देऊं नकोस—अन् जर असं करणं अगदींच अशक्य झालं तर मागीलदारच्या विहिरींत उडी घेऊन

जीव दे. ' मी तर्कसिद्धांतवादी कमलमणी ' तुला सिद्धांत म्हणून सांगतें, दोरीनं कळशी गळ्यांत बांधून उडी घेतलीस तर तुला सहज मरतां येईल. प्रत्यक्ष नवऱ्यावर जिचा विश्वास ठरत नाहीं तिनं मरावं हेंच उत्तम ! "

● ●

## —: १२ :—

● **अलिकडे** कांहीं दिवसांत नरेंद्राची वृत्ती हळुहळू बदलूं लागली होती. उन्हाळ्यांत एकदम आकाशांत येणाऱ्या ढगांप्रमाणें त्याच्या हृदयाचें निर्मल आकाश ढगाळूं लागलें होतें. तें पाहून सूर्यमुखी बाजूला जाऊन डोळे पुशीत असे. ती म्हणे, " आतां कमलचंच सांगणं ऐकावं. अशी श्रद्धा कां ढळते माझी ? ते पर्वतासारखे अचल आहेत—मलाच भ्रम झाला आहे का ? "

सूर्यमुखी वाळूचें धरण बांधीत होती.

त्यांच्या वाड्यांत एक डॉक्टर होता. सूर्यमुखी घरची मालकीण. चिकाच्या पडद्याआड राहून कुणाशींही बोलायची. मधें एक दासी असे. तिच्या तोंडानें सूर्यमुखी इतरांशीं बोले. याच पद्धतीनें तिनें डॉक्टरला विचारलें, " बाबूंची प्रकृति बरी दिसत नाहीं. तुम्हीं औषध कां देत नाहीं त्यांना ? "

डॉक्टर म्हणाले, " केव्हां बिघडली प्रकृती ? मला तर कुणीच कांहीं सांगितलं नाहीं ! "

" बाबूंनीं नाहीं का सांगितलं ? "

" नाहीं—काय होतंय त्यांना ? "

" काय होतंय तें तुम्हां डॉक्टरांना कळायचं कीं मला ? "

डॉक्टर बिचारा ओशाळला आणि म्हणाला, " मी आत्तांच जाऊन विचारतों त्यांना. "

डॉक्टरनां थांबवून सूर्यमुखी म्हणाली, " बाबूंना कांहीं विचारूं नका—नुसतं औषध द्या. "

डॉक्टरला वाटलें, हें निदान बरें. " औषध देतों—त्याची काळजी नको. " असें म्हणून त्यानें तिथून पाय काढला. नंतर दवाखान्यांत

जाऊन त्यानें थोडा सोडा, थोडी पोर्टवाईन, थोडें सिरप फेरीम्युरेटिस आणि कांहींतरी मातीमसण घालून एक बाटली भरून त्याच्यावर भागांची चिठी लिहून त्यानें पाठवून दिलें.

सूर्यमुखी नगेन्द्राला तें औषध द्यायला गेली तेव्हां त्यानें ती बाटली तिच्या हातून काढून घेऊन मांजराच्या अंगावर फेंकली. औषधांत मांजराची शेपटी भिजली.

सूर्यमुखी म्हणाली, " औषध घ्यायचं नसेल तर तुम्हाला काय होतंय तें तरी सांगा ना मला. "

नगेन्द्र चिडून म्हणाला, " काय होतंय मला ? "

" आतां तुम्हींच आपल्या डोळ्यांनीं पहा ! " असें म्हणून तिनें एक आरसा आणून त्याच्यासमोर धरला. तिच्या हातचा आरसा काढून घेऊन नगेन्द्रानें तो दूर फेंकून दिला. आरशाचे तुकडे तुकडे झाले.

सूर्यमुखीच्या डोळ्यांवाटे आसवांच्या धारा लागल्या, तें पाहून नगेंद्रचा राग अधिकच भडकला. तिथून बाहेर पडतांच त्यानें एका नोकराला उगीचच्या उगीच झोडपून काढलें. तो त्या नोकराला बसलेला मार सूर्यमुखीला जाणवला.

यापूर्वी नगेन्द्र अगदीं थंड्या स्वभावाचा होता. आतां शब्दाशब्दाला तो चिडत असे. नुसती चिडाचीडच नव्हे—एके दिवशीं रात्रीं जेवणाची वेळ टळून गेली. नगेन्द्र आला नाहीं म्हणून सूर्यमुखी वाट पहात बसली होती. मध्यान्ह रात्र उलटून गेली त्यावेळीं नगेन्द्र आला. त्याला पहातांच सूर्यमुखी घाबरून गेली. त्याचा चेहरा फुलला होता. डोळे लालभडक झाले होते. तो दारू पिऊन आला होता. यापूर्वी तो दारूला कधींही स्पर्श करीत नसे. तो आज दारू पिऊन आलेला पाहून सूर्यमुखीला धक्का बसला.

त्या दिवसापासून हा त्याचा नित्यक्रम सुरू झाला. एके दिवशीं सूर्यमुखीनें नगेन्द्राचे दोन्ही पाय घट्ट धरले आणि डोळ्यांत आसवें आणून काकुळतीला येऊन ती म्हणाली, " माझ्यासाठीं तरी ही सोडा. "

" त्यांत काय बिघडलं ? " नगेन्द्रानें विचारलें.

सूर्यमुखी म्हणाली, " काय बिघडलं तें मी कसं सांगू ? जें तुम्हाला माहित नाहीं तें मला कसं कळेल ? मी नुसती विनवणी करतेंय. "

नगेन्द्र म्हणाला, " सूर्यमुखी, मी दारूड्या आहें. दारूड्यावर श्रद्धा ठेवणं पटत असेल तर माझ्यावर श्रद्धा ठेव—नाहींतर नको. "

सूर्यमुखी बाहेर निघून गेली. आतां त्यानें नोकराला मारलें तरीदेखील डोळ्यांतून पाणी काढायचें नाहीं अशी तिनें प्रतिज्ञा केली. दिवाणजी तिला म्हणाले, " विषयसंपत्ती जाते आहे. बाबू कांहीं पहात नाहींत. ठिकठिकाणचे नोकर चाकर वाटेल तसें वागताहेत. धन्यांचं दुर्लक्ष असल्यामुळं माझं कोण ऐकत नाहीं. "

तें ऐकून सूर्यमुखी म्हणाली, " ज्याची संपत्ती त्यानं राखावी, नाहींतर जायची असली तर जाईलच. "

यापूर्वी नगेन्द्र सर्व कारभार स्वतःच पहात असे. एके दिवशीं तीनचार हजार रयत लोक नगेन्द्राच्या कचेरीच्या दाराशीं आले आणि हात जोडून म्हणाले, " दुहाई हुजूर ! नायब गुमास्त्यांच्या छळांमुळं जगणं कठीण झालंय. त्यांनीं सर्वस्व हिरावून घेतलं आमचं. आपण रक्षण केलं नाहींत तर कोण आम्हाला राखील ? "

नगेन्द्रानें हुकूम केला, " सर्वांना हाकलून काढ. "

पूर्वी एकदां एका गुमास्त्यानें एका रयतेकडून एक रुपया घेतला होता, त्यावेळीं नगेन्द्रानें गुमास्त्याच्या पगारांतून दहा रुपये कापून घेऊन त्या रयतेला दिले होते.

कमलमणीला सूर्यमुखीनें आणखी एक पत्र लिहिलें. त्याचा शेवट असा होता :

" एकदां येच ! कमलमणी—भगिनी ! तुझ्याशिवाय मला आपलं म्हणायला कोण नाहीं. एकदां येच ! "



## —: १३ :—

**कमलमणीचें** आसन ढळलें. आतां तिच्यानें राहावेना. ती आपल्या नवऱ्याकडे गेली त्यावेळीं तो जमाखर्च पहात होता. त्याच्या शेजारीं बिछान्यावर बसून त्याचा एक वर्षाचा मुलगा सतीशचंद्र इंग्रजी वर्तमानपत्र काबिज करून बसला होता. पहिल्यानें त्यानें तें खाऊन पहायचा प्रयत्न केला, पण तें न

जमल्यामुळें तें खालीं आंथरून तो वर बसला. कमलमणी आली आणि तिनें पदर गळ्यांत घेऊन जमिनीवर साष्टांग नमस्कार घातला आणि हात जोडून उभी राहून ती म्हणाली, " सलाम हुजुर ! "

श्रीशचंद्र हंसला आणि म्हणाला, " आतां काय चोरीला गेलंय ? कांकडी का ?"

" कांकडी भोपळा नव्हे, " कमलमणी म्हणाली, " यावेळीं भारीच मोठी चोरी झाली आहे—गोविंदपुरांत चोरी झाली आहे. दादाबाबूंच्या सोन्याच्या डबींत एक कवडी ठेवलेली होती ती चोरीला गेली आहे. "

तिची कोड्याची भाषा न कळल्यामुळें तो म्हणाला, " तुझ्या दादाबाबूंची सोन्याची डबी म्हणजे सूर्यमुखी—मग कवडी कुठली ? "

" सूर्यमुखीची अक्कल ! " कमल म्हणाली.

" कुणी चोरली ही अक्कल ? "

" तें कांहीं माहीत नाहीं. तिनं पत्र लिहिलंय, त्यावरून मला कळलंय कीं कवडी कुणीतरी खाल्लीय—नाहींतर सटवीनं असलं पत्र कां लिहिलं असतं ? "

" पत्र वाचायला मिळेल का आम्हाला ? "

" हें घ्या वाचा. " कमल त्याच्या हातीं पत्र देऊन म्हणाली, " तिनं नको म्हटलंय तरी देतेंय. तुम्हाला दाखवल्याशिवाय रहावेना. झोंप उडाली माझी."

" तिनं नको म्हटलंय मग मी कसं पाहूं ? " श्रीश म्हणाला. " तूंच काय तें आतां सांग अन् मी काय करायला हवंय तेवढंच मला सांग. "

" करायचं आहे तें एवढंच, " कमल म्हणाली, " सूर्यमुखीची अक्कल हरवली आहे. तिला थोडी अक्कल दिली पाहिजे. असं माणूस आहे एकच—सतीशबाबू. त्याला घेऊन गेलं पाहिजे गोविंदपूरला. "

इतक्यांत सतीशबाबूनें फुलांसकट फुलदाणी उलथून टाकली होती आणि त्याची नजर दौतीकडे वळली होती. तें पाहून श्रीशचंद्र म्हणाला, " चांगला अक्कलवंत शोधून काढलास. सतीश जायचा म्हणजे कमलमणी जायचीच ! "

" एवढंच का ? सतीशला बोलावलंय, मला बोलवलंय अन् तुम्हाला देखील बोलावलंय. "

" मला कशाला बोलावलंय ? "

" म्हणजे मी काय एकटी जाणार ?" कमल म्हणाली, " माझी वळकटी बिछाना घेऊन येणार कोण ?"

" वळकटी बिछाना नेण्यासाठीं जांवईबाबूच जर हवा असेल तर दोन दिवसांच्या मुदतीचा एक जांवई दाखवून देतों !" श्रीशचंद्र म्हणाला.

कमलमणी रागाला आली. तिनें भुवई चढवली. श्रीशचंद्राला एक चापटी चढवली आणि त्याच्या समोरचा कागद ओढून घेऊन तिनें फाडून टाकला.

श्रीशचंद्र हंसून म्हणाला, " मग पाठीं लागून आलीस कां ?"

" माझी खुषी !" कमल म्हणाली, " मी येणार !"

तसाच रागावल्याचा आव आणून श्रीश म्हणाला, " माझी खुषी ! मी बोलणार !"

चिडलेल्या कमलनें मूठ वळून त्याच्यावर उगारली. तें पाहून श्रीशचंद्रानें तिचा आंबाडा मोडून टाकला. ती अधिकच रागावली आणि तिनें दौतींतली शाई पिकदाणींत ओतली. तें पाहून सतीश मधें पडला. त्याला पहातांच दोघांनींही उचलून त्याला कवटाळून घेतलें. युद्ध संपून तह झाला त्यावेळीं श्रीशचंद्र म्हणाला, " खरोखरच का तुला गोविंदपुरला गेलं पाहिजे ? मग मी इथं एकटा कसा राहूं ?"

" एकटं राहायला कोण सांगतंय तुम्हाला ?" कमल म्हणाली, " मीही जाणार न् तुम्हीही यायचं बरोबर."

" मी कसा येणार ?" श्रीशचन्द्र म्हणाला, " माझी ही गर्दीच्या कामाची वेळ. तूं एकटीच जा."

कमलनें रागानें फतकल मारली आणि म्हटलें, " ये रे सतीश, आपण दोघं दोन बाजूला बसून रडायला सुरवात करूंया."

आईची हांक ऐकून सतीशनें पेन्सिल खाण्याचें काम तहकूब ठेवलें आणि हात पसरून तो मोठमोठ्यानें हंसला. अर्थात् कमलचें रडणें झालें नाहीं. सतीशला जवळ घेऊन तिनें त्याचा मुका घेतला—तें पाहून श्रीशनेंही तसेंच केलें. आपल्या बहादुरीची खूण पटवून सतीश पुन्हां एकदां मोठमोठ्यानें हंसला. पुन्हां समेट झाला तेव्हां कमल म्हणाली, " आतां काय हुकूम—बोला ?"

श्रीश म्हणाला, " तूं जा. मी नको म्हणत नाहीं, पण हे वसुलीचे दिवस, मला कसं येतां येईल ? "

तें ऐकून कमल फुरंगटून बसली. अर्थात श्रीशचन्द्रला पड खावी लागली. तो म्हणाला, " अशी रागावूं नकोस. खरोखरच मला येतां येत नाहीं. "

" खरोखरच का येतां येत नाहीं ? " कमल म्हणाली, " तर मग असं करा. माझी जाण्याची व्यवस्था करा. "

" परत केव्हां येणार आहेस ? " श्रीशनें विचारलें.

" हें कशाला विचारतां ? " कमल म्हणाली, " तुम्ही बरोबर नसतांना मी अशी किती दिवस रहाणार आहें तिथं ? "

श्रीशचन्द्रानें कमलमणीची गोविंदपुरला रवानगी केली. ती गेल्यापासून त्याचें लक्ष कोणत्याच कामाकडे लागत नव्हतें. प्रत्येक कामांत चुका होत होत्या. घरीं बसून तो कसाबसा वेळ काढीत होता.

● ●

## —: १४ :—

● **गोविंदपूरच्या** दत्तांच्या घरांत अंधारांत एक फूल उमललें. कमलमणीचें हंसतमुख पाहून सूर्यमुखीच्या डोळ्यांतलें पाणी ओसरलें. कित्येक दिवस सूर्यमुखीनें आपल्या केंसाकडे लक्ष दिलें नव्हतें. कमल येतांच तिनें तिचे केंस विंचरले आणि ती नको-नको म्हणत असतांना दोन सुंदरशीं फुलें तिच्या डोक्यांत खोवलीं; तेव्हां सूर्यमुखी म्हणाली, " कशाला उगीच ? लोक म्हणतील बुड्ढी घोडीको लाल लगाम. "

नगेन्द्र आला तेव्हां कमलमणीनें चट्कन उठून त्याला प्रणाम केला. नगेंद्र म्हणाला, " इकडे कुठं ग कमल ? "

कमल मान खालीं घालून सालसपणाचा आव आणून म्हणाली, " या गुलामानं आणलं पकडून मला. "

नगेन्द्र म्हणाला, " असं का ? मार दिला पाहिजे या पाजी बेट्याला. " असें म्हणून त्यानें सतीशला उचलून घेऊन त्याचा मुका घेतला. सतीशनेंही कृतज्ञतावशतः त्याचा गालगुच्चा घेऊन त्याची मिशी ओढली.

कुंदनंदिनी दिसली तेव्हां ती म्हणाली, "—अग ए कुंदी, मुंदी, दुंदी, खुशाल आहेस का ग कुंदी ?"

कुंदी थक्क झाली. क्षणभर विचार करून म्हणाली, " खुशाल आहें."

" खुशाल आहें दिदी, असं म्हणायचं !" कमल म्हणाली, " समजलीस ? मला दिदी म्हटलं नाहींस तर झोंपलीस म्हणजे तुझ्या केंसाला कोलीत लावीन नाहींतर खाजकुयली टाकीन."

दुसऱ्या दिवसापासून कुंदेनें तिला ' दिदी ' म्हणायला सुरवात केली. पूर्वीं ती कलकत्त्याला कमलकडे होती त्यावेळीं कमलला कांहींच म्हणत नसे. फारशी बोलतच नसे. तरीही स्वभावतःच प्रेमळ असलेली कमल तेव्हांपासूनच तिच्यावर फार माया दाखवी. मधें कांहीं वर्षें गेल्यामुळें कुंद तिला विसरली होती. पुन्हा तिची गट्टी जमली.

कमलमणी पुन्हां घरीं जायला निघाली तेव्हां सूर्यमुखी म्हणाली, " नाहीं ग— आणखीन् दोन दिवस रहा. तूं गेलीस तर मी जगायची नाहीं. तुझ्याशीं मोकळेपणानं चार शब्द बोललें, कीं तेवढंच समाधान वाटतं मला."

" तुझं काम केल्याशिवाय मी कांहीं जायची नाहीं." कमल म्हणाली.

" माझं कसलं काम करणार आहेस तूं ?" सूर्यमुखीनें विचारलें.

" तुझं श्राद्ध !" कमल मनांतल्या मनांत म्हणाली. उघड म्हणाली, " या कान्ताकुन्यांतून बाहेर काढायचीय तुला."

कमल जाणार आहे असें कळतांच कुंद आपल्या खोलींत जाऊन रडत बसली. उशींत तोंड खुपसून ती रडत होती तोंच कमल तिथें गेली आणि तिच्या मोकळ्या केंसांचा खोपा बांधूं लागली. तें एक वेडच होतें कमलचें.

कमलनें विचारलें, " कां ग रडत होतीस कुंदी ?"

" तुम्हीं जातां आहां का ?" कुंद म्हणाली.

" त्यासाठीं रडायला हवं कशाला ?" कमल म्हणाली.

" तुम्हीच तेवढी माझी माया करतां." कुंद म्हणाली.

" दुसरीं कुणींच नाहींत का माया करीत ?" कमलनें विचारलें. कुंद उगीच राहिली.

" सूर्यमुखी नाहीं माया करीत ? " कमल म्हणाली. कुंद गप्प. पुन्हां " माझ्या पासून लपवून ठेवूं नकोस. " कुंद गप्प. " दादाबाबू नाहीं माया करीत ? " कुंद गप्प. कमल म्हणाली, " तर मग माझ्याबरोबर कां येत नाहींस ? " तरीही कुंद बोलेना. " येतेस ना ? " कुंदनें नकारार्थी मान हालवली. कमल गंभीर झाली. तिनें कुंदनंदिनीला जवळ घेतली आणि तिच्या मस्तकावरून हात फिरवीत विचारलें, " कुंद, खरं बोलशील ? मी विचारीन तें सांगशील ? मी तुझी दिदी—माझ्याजवळ कांहीं लपवायचं नाहीं. खरं सांग—दादाबाबूवर तुझं प्रेम आहे—होय ना ? "

कुंदेनें उत्तर दिलें नाहीं. कमलमणीच्या खांद्यावर मान टाकून ती रडूं लागली. कमल म्हणाली, " कळलं ! मरायला उठली आहेस ! तूं मर हवी तर ! पण आपल्याबरोबर दुसऱ्याला कां मारते आहेस ? " कुंदेनें एकदां मान वर करून कमलच्या तोंडाकडे पाहिलें. कमल समजली. ती म्हणाली, " जळ्ळं तुझं तोंड तें ! तुला दिसत नाहीं काय ग ?—" कमलचें वाक्य तेवढेंच राहिलें. कुंदेचें मस्तक कमलच्या खांद्यावर झुकून पडलें होतें. तिच्या डोळयांतल्या आसवांनीं कमलचें अंग भिजून गेलें होतें. बराच वेळ ती तशीच राहिली होती.

प्रेम म्हणजे काय याची कमलला यथातथ्य कल्पना होती. मनांतल्या मनांत ती काय समाजायचें तें समजली. तिला फार दुःख झालें होतें. कुंदेचे डोळे पुसून ती म्हणाली, " कुंद, माझ्याबरोबर चल. " कुंदेच्या डोळ्यांवाटे आसवांचा पाझर लागला. कमल म्हणाली, " आतां नाहीं म्हणू नकोस. सोन्या-सारखा संसार उसकटून जातोय ! नीट विचार करून पहा. येतेस ना ? "

कुंद बराच वेळ उगीच राहिली होती—नंतर डोळे पुसून म्हणाली, " येतें. "

उत्तर द्यायला तिला इतका वेळ कां लागला याची कमलला कल्पना आलेली होती. दुसऱ्याच्या कल्याणासाठीं कुंदनंदिनी आपल्या जिवाचा बळी द्यायला सरसावली होती. नगेन्द्राच्या कल्याणासाठीं, सूर्यमुखीच्या कल्याणासाठीं, नगेन्द्राला विसरून जायला ती तयार झाली होती, म्हणूनच उत्तर द्यायला तिला वेळ लागला. आणि—

आणि तिचें स्वतःचें कल्याण ? आपलें कल्याण कशांत आहे तें कुंदनंदिनीला कळत नव्हतें, हें कमलला कळून चुकलें होतें.

● ●

## —: १५ :—

• **याचवेळीं** हरीदासी वैष्णवी येऊन तिनें आपलें गाणें सुरू केलें. त्यावेळीं सूर्यमुखी तिथें हजर होती. तिनें गाणें ऐकण्यासाठीं कमलला बोलावणें पाठवलें. कुंदेला घेऊन कमल आली त्यावेळीं वैष्णवीनें नवीन गाणें सुरू केलें. तें गाणें शृंगारिक होतें. तें ऐकून कमल चिडून म्हणाली, " तूं वैष्णवी का ? आग लागली तुझ्या तोंडाला ती—आतां मर एकदांची ! असल्या गाण्यांखेरीज दुसरं गाणं येतच नाहीं का तुला ? "

वैष्णवी म्हणाली, " कां ? काय झालं ? "

कमल अधिकच भडकून उठली आणि म्हणाली, " काय झालं म्हणजे काय ? एक बाभळीची काठी आणा ग !—कांट्यानं झोडपून काढलं म्हणजे काय तें कळेल या सटवीला ! "

सूर्यमुखी शांतपणें वैष्णवीला म्हणाली, " हीं असलीं गाणीं आम्हाला आवडत नाहींत. गृहस्थाच्या घराला शोभेल असं चांगलंसं कांहीतरी म्हण. "

हरिदासी म्हणाली, " ठीक आहे." तिनें गायला सुरवात केली—

कमल पुन्हां रागारागानें म्हणाली, " हें पहा वहिनी, तुला हीं असलीं गाणीं ऐकायचीं असलीं तर ऐक. मी चाललें. " असें म्हणून ती चालती झाली. सूर्यमुखीही तशीच तोंड वाकडें करून निघून गेली. जमलेल्या स्त्रियांपैकीं कांहीं निघून गेल्या तर कांहीं बसून राहिल्या. कुन्द मात्र बसून राहिली होती. तिला त्या गाण्यांतलें मर्म कळलें नव्हतें—तें गाणें तिच्या कानीं गेलेंच नव्हतें—तिचें लक्ष कुठेंतरी भलतीकडेसच होतें, म्हणून ती तशीच बसल्या जागीं राहिली होती.

त्यानंतर वैष्णवी गायली नाहीं. ती इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत बसली होती. आतां गाणें होत नाहीं असें पाहून बाकीच्या बायका उठून गेल्या. गेली नाहीं काय ती कुन्द. कुन्द एकटीच सांपडतांच हरिदासी तिच्याशीं बोलूं लागली, पण कुन्दच्या कानीं तें जात नव्हतें.

सूर्यमुखी दूर उभी राहून तें पहात होती. कुंद आणि वैष्णवी विशेष जिव्हाळ्यानें बोलताहेत असें पाहून तिनें कमलला बोलावून तें दाखवलें. कमल

म्हणाली, "त्यांत काय झालं? बोलताहेत तर बोलूं दे. बाईच आहे ना ती—पुरुष तर नव्हे!"

सूर्यमुखी म्हणाली, "बाई कीं पुरुष तें तरी कसं सांगायचं? मला संशय येतोय, कीं हा स्त्रीवेषधारी पुरुष असावा. आतां कळेलच तें. कुंद अशी पापी कशी निपजली?"

"थांब. एक बाभळीचा फोकच आणतें. माझी करामत दाखवतें आतां." असें म्हणून ती जायला निघाली तोंच मधें सतीश दिसला. सूर्यमुखीचा कुंकवाचा करंडा घेऊन तो गाला तोंडाला, नाकाला पट्टे ओढीत होता. तें पहातांच कमल 'वैष्णवी, कुंद, बाभळीचा फोक,' सारं कांहीं विसरून गेली.

ती आली नाहीं असें पाहून सूर्यमुखीनें हिराला बोलावलें. हिरा दासी असली तरी ती त्यांच्याच जातीची होती. दारिद्य आलेल्या एका सभ्य घराण्यांतली होती. तिची आजीही पूर्वी याच घरीं रहात होती. आतां वृद्ध झाल्यामुळें आपल्याजागीं हिरेला ठेवून ती गोविंदपुरांत घर बांधून राहिली होती.

हिरा वीस वर्षांची होती. बाकीच्या दासदासींपेक्षां ती वयानें लहान असली तरी तिचा दर्जा बराच वरचा समजला जात असे. हिरा बालविधवा आहे असें सारे म्हणत. पण तिचा नवरा कोण आणि तो केव्हां मेला तें कुणालाच माहित नव्हतें. अजून तिला कुणी नांव ठेवलें नव्हतें. ती मोठी तोंडाळ होती आणि सधवेसारखा नीटनेटका वेष करायची तिला संवय होती.

हिरा आली तेव्हां सूर्यमुखीनें विचारलें, "या वैष्णवीला ओळखतेस?"

हिरा म्हणाली, "नाहीं. मी कधीं कुठं बाहेर जातेंय? दुसऱ्या कुणाला तरी बोलावून विचारा. ठाकूरवाडींत चौकशी करायला सांगा."

"ही ठाकूरवाडींतली वैष्णवी दिसत नाहीं." सूर्यमुखी म्हणाली, "हिचा पत्ता काढला पाहिजे. कुंदेबरोबर हिचं एवढं रहस्य कां? ही सारी बातमी काढून आणशील तर मी तुला एक बनारसी साडी देईन. आतांच तिच्या मागोमाग गेलीस—तिला दाद न लागूं देतां गेलीस—तर तुला तिचा पत्ता काढतां येईल."

इतक्यांत कमल आली. हिरेबरोबर झालेलें भाषण तिनें कमलला सांगितलें. ती हिरेला म्हणाली, "अन् जमलं तर त्या सटवीला बाभळीच्या काठीचे दोन तडाखे हाण."

••

## —: १६ :—

● त्या दिवशीं संध्याकाळच्या वेळीं बागेंतल्या तलावाच्या कांठीं कुंदनंदिनी बसली होती. ती आपल्या परिस्थितीचा विचार करीत होती. बगीच्यांतलीं फळें फुलें, झाडावर उडणारे पक्षी, फुलांनीं बहरलेल्या वेली, त्यावेळीं तिच्या हिशेबांत नव्हत्या. विचारांनीं भारावलेल्या तिच्या मनाच्या ओढीपुढें निसर्गाचें सौंदर्य तिच्या दृष्टीआड झालें होतें. ती सारखा नगेन्द्राचाच विचार करीत होती. तिला आपली पूर्व परिस्थिती आठवत होती. आई गेली, बाप गेला, लग्न झालें तो नवराही वारला आणि पुन्हां नगेंद्राच्या घरीं यावें लागलें. पण नगेंद्र होता सूर्यमुखीचा. त्याच्या नांवाचा ध्यास कशाला? तिला वाटलें, "सूर्यमुखी सुंदर आहे—माझ्यापेक्षांही सुंदर आहे. तिला टाकून त्यानं माझ्याकडे कां पहावं? तो आहे सूर्यमुखीचा—त्याची अभिलाषा मी कां धरावी? कलकत्त्याला जाऊं का? तिथं नगेंद्र दिसला नाहीं तर मला चैन पडेल का? पण इथं कशी राहूं? सूर्यमुखीच्या मनांत माझ्याबद्दल किल्मिष आलंय—आतां इथून जावं हें बरं!—तरीही जावंसं वाटत नाहीं—मग काय करावं? तळ्यांत उडी घेऊन जीव द्यावा का? असा जीव देण्यासाठींच का बाबा, तुम्हीं मला मागें टाकून गेलां?—" दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेऊन कुंद रडूं लागली.

एकदम तिला आठवण झाली—स्वप्नांत दिसलेली आई तिला आठवली. तिनें दिलेली धोक्याची सूचना तिला आठवली. तिनें मनाचा निश्चय केला—जीव देण्याखेरीज गत्यंतर नाहीं. तलावाच्या पायऱ्या उतरून ती हळुहळु खालीं जाऊं लागली—तितक्यांत कुणीतरी तिच्या पाठीवर हात ठेवून तिच्या नांवानें हांक मारली. तिनें मागें वळून पाहिलें—तो नगेंद्र होता.

जीव देण्याचा विचार तिथल्या तिथेंच राहिला.

"कुंद, तूं कां रडते आहेस?" असें त्यानें विचारलें तेव्हां कुंदेला अधिकच रडें कोसळलें. नगेंद्र बोलत होता, "ऐक कुंद, इतके दिवस मोठ्या कष्टानं मी माझं मन आवरलं, पण आतां अशक्य झालंय. अजून जीव धरून कसा राहिलोंय तें माझं मला माहित. सारखा झगडा सुरू झाला आहे मनांतल्या मनांत! अधःपात झालाय माझा!—मी दारूड्या बनलोंय! नाहीं—मी

तुला आतां हातची सोडणार नाहीं! ऐकलंस कुंद, आतां विधवा-विवाह प्रचलित झाला आहे. मी विवाह करीन तुझ्याबरोबर. तूं नुसतं होय म्हण!"

कुंद नुसतें 'नाहीं' म्हणाली.

नगेंद्रनें पुन्हा विचारलें, "असं कां म्हणतेस तूं? विधवा-विवाह काय अशास्त्रीय आहे?" कुंद पुन्हां 'नाहीं' म्हणाली. तो म्हणाला, "मग नाहीं कां म्हणतेस? बोल—बोल—बोल—माझी गृहिणी होशील का तूं? प्रेम करशील का माझ्यावर?"

तरीही कुंद 'नाहीं' म्हणाली. नगेन्द्र आतां अगदीं उतावीळ झाला होता. जीव टाकून प्रेमाची याचना करीत होता आणि कुंद नुसतें 'नाहीं' म्हणत होती.

नगेंद्रनें इकडे तिकडे पाहिलें. तलावांतलें पाणी अगदीं शांत होतें, निर्मळ होतें, शीतल होतें. मधून मधून वाऱ्याची झुळुक आली, कीं त्याच्यावर तरंग उठत होते. त्याला वाटत होतें, कां या पाण्याचा ठाव घेऊं नये?

कुंदही विचार करीत होती. शास्त्रांत विधवाविवाहाला आधार आहे—पण तो तिच्यासाठीं नव्हे. ती नुसतें 'नाहीं' म्हणत होती! मग तिनें पाण्यांत बुडी कां दिली नाहीं? पाणी स्वच्छ होतें—शीतळ होतें—आकाशांतलीं नक्षत्रें पाण्यांत नाचत होतीं.

मग कुंदेनें त्यांत उडी कां घेतली नाहीं?

● ●

## —: १७ :—

● **हरिदासी** वैष्णवी बगीच्याच्या घरांत येऊन पुन्हां देवेंद्रबाबू झाली. शेजारीं हुक्का होता तो पेटवून त्यानें ओढायला सुरवात केली. शेजारीं स्फटिक पात्रांत हेमांगी 'एक्शाकुमारी' झुळझुळत होती. गुडगुडी म्हणत होती—'माझं चुंबन घे!' एक्शाकुमारी म्हणत होती—'आधीं माझ्या ओंठांना ओंठ दे! कसा सुंदर रंग आहे माझा!' देवेंद्र मोठ्या पेंचांत पडला होता.

शेवटीं त्यानें दोघांचेंही मन राखलें. गुडगुडीचें चुंबन घेतलें तेव्हां प्रेमाचा धूर चोहींकडे पसरला. एक्शॉकुमारीला हृदयांत ठाव दिला तेव्हां ती हळुहळु मस्तकाला चढली.

इतक्यांत सुरेन्द्र आला. त्यानें त्याला विचारलें, "आज तूं पुन्हां कुठं गेला होतास ?"

"इतक्यांत गेलं का तुझ्या कानीं ?" देवेन्द्रनें विचारलें.

"तुला काय वाटतं ?" सुरेन्द्र म्हणाला, "तुला काय वाटतंय ? हें काय गुपचुप चाललंय ?"

देवेंन्द्र म्हणाला, "देवाशपथ, मला कांहींसुद्धां चोरून करायचं नाहीं."

सुरेन्द्र म्हणाला, "ही कांहीं मोठीशी बहादुरी नाहीं. वैष्णवीचं सोंग घेऊन दारादारांतून फिरायला तुला लाज वाटली पाहिजे होती !" त्याच्या हातचा दारूचा पेला काढून घेऊन तो म्हणाला, "जरा थांब. शुद्धीवर आहेस तोंवर मी काय म्हणतों तें ऐकून घे. आधीं मला हें सांग, वैष्णवीचं सोंग घेतलंस तें कुणाचा सत्यानाश करण्यासाठीं ?"

"तुला नाहीं का माहीत ?" देवेंद्र म्हणाला, "ताराचरण मास्तरबरोबर एका अप्सरेचा विवाह झाला होता. ती विधवा होऊन आतां दत्तांच्या घरीं तुकडे मोडते आहे. तिला भेटायला गेलों होतों."

"ही कां दुर्बुद्धी झाली तुला ?" सुरेंद्र म्हणाला, "एका अनाथ पोरीचा अधःपात करायला कां सरसावला आहेस ? देवेंद्र, तूं महापापी आहेस, अत्याचारी आहेस, कसाब-खाटीक आहेस ! यापुढं तुझा सहवास सुद्धां नको मला."

सुरेंद्र इतक्या निर्धारानें बोलत होता, कीं तें ऐकून देवेंद्र क्षणभर स्तब्ध झाला. नंतर तो म्हणाला, "तूं राग धरूं नकोस माझा. माझं मन माझ्या ताब्यांत नाहीं. मी सर्वस्वाचा त्याग करीन, पण सुन्दर स्त्रीचा मोह मला सोडतां यायचा नाहीं. ताराचरणच्या घरीं पहिल्यानंच मी तिला पाहिली तेव्हांपासूनच मी तिच्यासाठीं वेडा झालोंय. नुसती तिला पहाण्यासाठीं म्हणून मी वैष्णवीचं सोंग घेऊन गेलों होतों. तूं कांहीं भिऊं नकोस—मोठी साध्वी आहे ती !"

"मग जातोस कां ?" सुरेंद्रानें विचारलें.

"नुसतं तिला पहाण्यासाठीं ! नुसतं तिला पाहिलं, तिच्याशीं चार शब्द बोललों, म्हणजे मला केवढं समाधान वाटतं तें तुला सांगतां यायचं नाहीं !"

सुरेंद्र म्हणाला, “ तुला मी खरं खरं सांगतों—तूं ही दुर्बुद्धी सोडली नाहींस, असाच आपला हट्ट चालवलास, तर यापुढं तुझं माझं भाषण सुद्धां बंद. मी तुझा दुष्मन झालों म्हणून समज. ”

“ असं म्हणूं नकोस. ” देवेन्द्र म्हणाला, “ तूंच काय तो एक माझा जिवाभावाचा मित्र आहेस. मी माझी सारी दौलत सोडीन, पण मीं तुला सोडणार नाहीं—पण कुंदनंदिनीला पाहायची इच्छा सोड असं तूं म्हटलंस तर मी तुझ्यावर सुद्धां लाथ मारीन ! ”

“ तर मग होऊन जाऊं दे ! ” सुरेंद्र म्हणाला, “ तुझी माझी हीच शेवटची भेट. ” असें म्हणून तो तिथून चालता झाला.

एकुलता एक मित्र सोडून गेला हें पाहून देवेंद्राला कांहीं वेळ अत्यंत वाईट वाटलें होतें. त्यानें बराच विचार करून पाहिलें. शेवटीं तो आपल्याशींच म्हणाला, “ गेला तर खुशाल जाऊं दे ! कुणाचा कोण आहे या जगांत ? माझा म्हणायला आहें मीच ! ” असें म्हणून त्यानें ब्रँडीची बाटली पेल्यांत ओतली आणि त्यानें तो पेला लगेच खालीं केला. हळुहळू त्याला हुषारी वाटूं लागली. आडव्या पडलेल्या जिभेनें तो गाऊं लागला.

यावेळीं त्याच्या टोळक्यांतले त्याचे दोस्त भगत कुणीच तिथें नव्हते. पडल्याजागीं तो उगीच लोळत होता. तितक्यांत खिडकीचें झडप खडखडलें. कुणी तरी दार उघडायचा प्रयत्न करीत होता. देवेंद्र तो खडखड आवाज ऐकत स्वस्थ पडला होता. खिडकी एकदां उघडली आणि पुन्हां बंद झाली. तो धडपडत उठून खिडकीपाशीं गेला. एक बाई तिथून पळून जात होती. देवेंद्रनें खिडकीबाहेर उडी मारली आणि तोही तिच्यामागें धांवत सुटला. तिच्या मनांत असतें तर तिला सहज निसटून जातां आलें असतें, पण नकळत असो कीं जाणुन-बुजून असो, काळोखांत ती बागेंतला रस्ता चुकून घुटमळत राहिली. देवेंद्रानें तिला पकडलें आणि काळोखांतच तो तिला निरखून पाहूं लागला. दारूच्या कैफांत त्यानें तिला विचारलें, “ कुठल्या झाडावरून पडलीस ग ? ”

ती कांहीं बोलत नाहीं असें पाहून तिच्या हाताला धरून त्यानें तिला ओढीत आंत आणलें आणि दुसऱ्या हातानें दिवा तिच्या समोर धरून तो म्हणाला, “ तूं कुणाची ग बायको ? ”

अजूनही तो दारूच्या कैफांत बोलत होता, "—कशाला ग आलीस इथं ? आज अमावास्येच्या दिवशीं पुरीसागोतीचा नैवेद्य दाखवणार होतों तुला. पण आतां ही नुसती ब्रँडीच राहिली आहे—एवढी पिऊन जा !" असें म्हणून त्यानें तिला बैठकीवर बसवलें आणि दारूचें भरलेलें ग्लास तिच्या पुढें केलें. तिनें तें हातीं घेऊन तसेंच खालीं ठेवलें. तो पुन्हा विचारीत होता, "कोण ग तूं ? ओळखीचीशी दिसतेस ? कुठं मी पाहिलं होतं तुला ?"

त्यानें आपल्याला ओळखलें असें समजून ती म्हणाली, "मी हिरा !"

"हुर्रेऽ ! थ्री चिअर्स् फॉर हिरा !" असें म्हणून त्यानें तिला साष्टांग नमस्कार घातला.

तो उठून बसला आणि म्हणाला, "आतां सांग मालिनीमावशी, काय आहे तुझ्या मनांत ?"

हिरा आधींच त्याचा पाठलाग करीत आली होती. देवेंद्र म्हणजेच वैष्णवी हें तिला कळून चुकलें होतें. रात्रीच्या वेळीं येऊन ती खिडकीशीं चाहूल घेत होती. सुरेंद्र आणि देवेंद्र या दोघांचें भाषण ऐकल्यामुळें तिचा उद्देश सिद्धीस गेला होता. जातां जातां तिचा धक्का लागून ती खिडकी उघडली त्यामुळेंच सारा घोटाळा झाला.

हिरा तिथून पळूं पहात होती, पण देवेंद्रानें तिचा हात पकडला आणि दारूचा पेला तिच्या हातीं दिला. हिरा म्हणाली, "आपणच घ्या."

देवेंद्रानें पेला लगेच घशाखालीं ओतला.

आतां दारूचा अम्मल पुरा पुरा चढला होता. देवेंद्र त्या कैफांत तिथेंच आडवा पडला असें पाहून हिरेनें तिथून पळ काढला.

त्या रात्रीं हिरा दत्तांच्या वाड्यांत गेली नाहीं. रात्रीं आपल्या आजीच्या घरीं राहिली. दुसरे दिवशीं सकाळीं उठून ती सूर्यमुखीपाशीं गेली आणि तिनें देवेंद्राची सर्व कारवाई तिला सांगितली. कुंद निर्दोषी होती, एवढेंच मात्र ती बोलली नाहीं आणि सूर्यमुखीलाही तो अंदाज आला नाहीं. देवेंद्राच्या भाषणांतला तेवढाच भाग सांगायचें हिरेनें टाळलें होतें.

कुंद वैष्णवीबरोबर कानाशीं लागून कुजबुजत होती, अर्थात ती दोषी होती असाच सूर्यमुखीनें समज करून घेतला होता. हिरेनें

सांगितलेली हकिकत ऐकून तिचा राग अधिकच भडकला. सूर्यमुखीनें ती हकिकत कमलला सांगितली. सूर्यमुखीनें कुंदेला बोलावून घेतलें आणि म्हटलें, "कुंन्द, हरिदासी वैष्णवी कोण तें आम्हाला कळलंय—आणि ती तुझी कोण तेंही कळलंय—अन् तूं कशी आहेस तेंही कळलंय! असल्या बाईला आमच्या घरांत जागा व्हायची नाहीं. तूं आतांच्या आतां घराबाहेर हो, नाहींतर हिरा तुला झाडू मारून बाहेर काढील."

कुंद थर थर कापूं लागली. कमलनें पाहिलें, कीं ती भिरभिरून पडत होती. कमलनें तिला धरून सांवरलें आणि आपल्या शेजघरांत नेलें. कमलनें अनेकपरीनें तिचें सांत्वन केलें आणि म्हटलें, "ती मेली काय वाटेल तें बोलो—मला तिचा एक शब्दसुद्धां खरा वाटत नाहीं."

● ●

## —: १८ :—

**मध्यान्हरात्रीं** सारीं माणसें गाढ झोंपी गेलीं असतां खोलीचें दार उघडून कुंद बाहेर आली. नेसल्या वस्त्रानिशीं ती सूर्यमुखीचें घर सोडून निघाली होती. सतरा वर्षांची अनाथ पोर—संसार समुद्रांत झेंप घ्यायला एकटीच तयार झाली होती.

काळोख मिट्ट पडला होता. थोडथोडा पाऊसही पडत होता. जायचें कुठें? रस्ता कुठला? कोण रस्ता दाखवणार? आजवर ती या घराबाहेर कधींच बाहेर पडली नव्हती. कुठें जावें हें तिला कसें कळणार होतें? आणि ती जाणार होती तरी कुठें?

तिनें मागें वळून वाड्याकडे पाहिलें. नगेंद्राच्या झोंपायच्या खोलींत उजेड दिसत होता. तो पहातांच तिचे डोळे खिळले. नगेन्द्राच्या शेजघराच्याखालीं एक झाड होतें, त्याखालीं उभी राहून ती त्या खिडकीकडे पहात होती. चोंहीकडे अंधकार होता. झाडांच्या फांद्याफांद्यांतून काजवे चमकत होते. आकाशांत काळे काळे ढग घिरट्या घालीत होते. जवळच कुठेंतरी घुबड घु घू करीत होतें—पण तिची नजर होती त्या खिडकीवर. पहातां पहातां त्या खिडकीचें एक झडप उघडलें. आंतल्या उजेडामुळें खिडकींत उभी रहाणारी व्यक्ती तिला दिसली—

तो नगेंद्र होता. तो आतां दृष्टीआड होईल म्हणून कुंद घाबरली. खिडकी उघडतांच बाहेरचीं भुरभुरीं पांखरें आंत जाऊन दिव्यावर आदळलीं. कुंद आपल्याशींच म्हणाली, " मी अशीच भाजलें—मी मेलें कां नाहीं ? "

नगेंद्रनें पुन्हां झडप बंद केलें. आंतला दिवा मालवला गेला. त्या खिडकी-कडे सारखी टक लावून पाहिल्यामुळें कुंदच्या डोळ्यांत पाणी आलें होतें. डोळे पुसून ती चालूं लागली होती. समोर रस्ता दिसला—कुठला रस्ता होता तो ?

झाडाच्या सळसळत्या पानांनीं तिला विचारलें, " कुठं चाललीस ? " चमचमणाऱ्या काजव्यांनीं तिला विचारलें, " कुठं चाललीस ? " पलिकडल्या घुबडानेंही तेंच विचारलें, " कुठं चाललीस ? " वरची खिडकी म्हणाली, " जाईना का ! आतां मी तिला नगेंद्र दिसूं देणार नाहीं ! " तरीसुद्धां कुंद पुन्हा पुन्हा मागें वळून पहात होती.

कुंद चालूं लागली—ती चालत होती—नुसतीं पावलें टाकीत होती—आकाशांत मेघ पळत होते—बिजली पुन्हां पुन्हां हंसत होती—वारा घोंघावत होता—मेघ गडगडत होता—आकाश आणि रात्र एकाच स्वरांत तिला विचारीत होतीं, " कुंद, कुठं चाललीस ? "

एकदम सोसाट्याचा वारा सुरू झाला. पहिल्यानें चार दोन थेंब पडले. लगेच पावसाची सर सुरू झाली. आतां कुंद कुठें जाणार होती ? विजेच्या प्रकाशांत कुंदला रस्त्याच्या कडेला एक घर दिसलें. पावसाची झड चुकवण्या-साठीं ती त्या दाराशीं आली. ती खालीं बसली. तिनें दाराला पाठ टेकतांच आवाज झाला. आंतलीं माणसें जागीं झालीं असावीं. कुणीतरी दार उघडलें आणि म्हटलें, " कुत्रं का तें ?—नाहीं नाहीं—ही कुणी बाई दिसते. कोण ग तूं ? " कुंद कांहीं बोलली नाहीं. तेव्हां त्या व्यक्तीनें पुन्हां विचारलें, " कोण ग ती सटवी ? "

कुंद म्हणाली, " पावसामुळं आडोशाला राहिलेंय. "

ती व्यक्ति पुन्हां म्हणाली, " काय ? काय ? काय ? पुन्हां बोल ना ! "

" पावसासाठीं इथं उभी राहिलें आहें. " कुंद म्हणाली.

" हा आवाज ओळखीचा दिसतोय. " ती व्यक्ती म्हणाली, " खरंच ! आंत घरांत ये ना ! "

त्या व्यक्तीनें तिला आंत घेतलें आणि दिवा पेटवला. कुंदनें पाहिलें, ती हिरा होती.

हिरा म्हणाली, " कळलं ! तुला घालवली वाटतं ? पळालीस वाटतं ? भिऊं नकोस. मी कुणालाही कळूं द्यायची नाहीं. इथंच रहा दोन दिवस ! "

● ●

—: १९: —

● **हिराचें** घर झोंपडीवजा होतें. त्याच्या आजूबाजूला परसूं होतें आणि त्यांत फुलझाडाप्रमाणेंच भाजीपालाही होता. बाबूंच्या वाड्यावरचा माळी येऊन या झाडांची मशागत करी आणि हिरा त्याला स्वतःच्या हातानें गुडगुडी भरून देई. हिराची आजी याच घरांत राही. एका खोलींत ती आणि दुसऱ्या खोलींत हिरा झोंपत असे. हिरानें आपल्या खोलींत बिछाना घालून कुंदेची झोंपायची सोय केली. कुंदेनें सांगितल्याप्रमाणें तिनें तिला लपवून ठेवलें. आजीनें पाहूं नये म्हणून तिनें त्या खोलीला कुलूप लावलें आणि नंतर ती वाड्यावर कामाला गेली. दुसऱ्या प्रहरीं तिची आजी स्नानाला गेली तेव्हां येऊन हिरेनें कुंदेचें स्नानभोजन उरकून घेतलें आणि पुन्हां कुलुप लावून ती निघून गेली. रात्रीं आल्यावर खोली उघडून दोघीही झोंपीं गेल्या.

रात्रीच्या वेळीं कुणीतरी अगदीं हलकेच दाराची कडी वाजवीत होतें. हिराला आश्चर्य वाटलें. तिनें जाऊन दार उघडलें आणि पाहिलें, तों ती मालती गौळण होती. तिचें घर देवीपूरला देवेंद्रबाबूंच्या शेजारीं होतें. मोठी रसिक होती ही गौळण. मालतीला पहातांच हिरा म्हणाली, " अगबाई ! यावेळीं तूं इकडे कुठं ?

गौळण म्हणाली, " तुला देवेंद्रबाबूंनीं बोलावलंय. "

ती तिला निघायला घाई करीत होती.

वाड्यावरून बोलावणें आलें आहे असें कुंदला सांगून हिरानें दिवा मालवला आणि काळोखांतच तिनें कपडे बदलले. नीटनेटकी सजून ती मालती-बरोबर निघाली.

देवेंद्राच्या बैठकखान्यांत हिरा एकटीच गेली. देवेंद्र देवीची आराधना करीत होता, तरीही बराच शुद्धीवर होता. आज त्याच्या बोलण्याचें धोरण बदललें होतें. तो अगदीं सरळ सरळ म्हणाला, "हिरे, त्या दिवशीं मला दारू अधिक चढली होती. तुझ्या भाषणांतलं मर्म त्यावेळीं कळायला मी असमर्थ होतों. तूं त्या दिवशीं कां आली होतीस तेंच विचारण्यासाठीं मी तुला बोलावायला पाठवलं."

"नुसतं आपलं दर्शन घ्यायला आलें होतें मी!" हिरा म्हणाली.

देवेंद्र हंसला आणि म्हणाला, "तूं फार हुषार आहेस. नगेन्द्रबाबूला तुझ्यासारखी दासी मिळाली आहे हें त्याचं भाग्यच म्हणायचं. तूं हरिदासी वैष्णवीच्या मागावर आली होतीस तें मला कळलंय—माझा अंदाज घ्यायला आली होतीस—मी वैष्णवीचं सोंग घेऊन तिकडे कां गेलों त्याचा तपास करायला आली होतीस—ही बातमी काढून दिल्यामुळं तुझ्या धन्यानं तुला बक्षिस दिलं असेल. आतां माझं एक काम कर. मीही तुला बक्षीस देईन."

ज्याचें चरित्र पापानें बुरसटलेलें असतें त्यांच्या सर्व गोष्टी स्पष्टपणें लिहिणें कठीण असतें. पुष्कळसे पैसे द्यायची लालूच दाखवून देवेंद्रनें कुन्देला आणून आपल्या स्वाधीन करायला हिराला सांगितलें.

तें ऐकून हिरा एकदम भडकली आणि म्हणाली, "मी दासी आहें म्हणून तुम्हीं माझ्यासमोर असं बोललां! मी माझ्या धन्याला सांगेन हें. याचं उत्तर तेच देतील." असें म्हणून हिरा तिथून तणतणत बाहेर पडली.

देवेन्द्र कांहीं वेळ निराश होऊन पडला होता. थोड्या वेळानें त्यानें ब्रँडीची बाटली काढली आणि प्यायला सुरवात केली.

● ●

## —: २० :—

● **सकाळींच** उठून हिरा कामावर गेली. दत्तांच्या वाड्यांत दोन दिवस सारखी धांवाधांव चालली होती. कुन्देचा पत्ता लागत नव्हता. कुन्द घरांतून निघून गेली ही बातमी नगेंद्राला कळली, पण ती कां गेली तें मात्र कुणी त्याला

सांगितलें नाहीं. नगेंद्राला वाटलें, कीं आपलें भाषण ऐकून या घरांत राहाणें कुन्देला अनुचित वाटलें असावें आणि म्हणून ती गेली असावी. असेंच होतें तर ती कमलबरोबर कां गेली नाहीं ?

नगेंद्र वेडापिसा झाला होता. त्याच्यापुढें जायला कुणाला धीर होत नव्हता. सूर्यमुखीनें काय केलें हें जरी त्याला कळलें नव्हतें, तरीही त्यानें तिच्याशीं भाषण वर्ज्य केलें होतें.

रागानें असो कीं मत्सरानें असो, मनाचा तोल सुटून सूर्यमुखीनें कुंदेला जायला सांगितलें होतें खरें, पण ती पळून गेली हें कळल्यावर तिला पश्चात्ताप झाला. देवेंद्राचें म्हणणें विश्वासयोग्य नव्हतें असें कमलमणीनें तिला समजावून सांगितलें. देवेंद्र दारूड्या होता. दारूच्या कैफांत हिरेपाशीं काय वाटेल तें बोलला असेल, असें कमल म्हणाली तेव्हां सूर्यमुखीला तें पटलें आणि तिच्या मनावर कमलच्या भाषणाचा परिणाम झाला. त्यांतच नवऱ्याचा अबोला तिला जाणवला. तिनें शंभर वेळ कुंदेला शिव्या दिल्या आणि हजार वेळ स्वतःला शिव्या देऊन घेतल्या.

कमलनें मात्र कुणालाच शिव्या दिल्या नाहींत. तिनें कलकत्त्याला जाणें रहित केलें. गळ्यांतला हार काढून सर्वेत्रांना दाखवून ती म्हणाली, " जो कुणी कुंदेला आणून देईल त्याला हा हार देईन. "

पापी हिरा हें सारें कांहीं पहात होती पण कांहींच बोलत नव्हती. कमलचा हार पाहून तिच्या तोंडाला क्षणभर पाणी सुटलें पण लगेच तिनें मन आवरलें.

नित्याप्रमाणें कुंदाची व्यवस्था करून रात्रीं त्या दोघीही झोंपी गेल्या. मनांतल्या दुःखानें कुंदेला झोंप लागत नव्हती. हिराही आपल्या विवंचनेच्यापायीं बिछान्यांत पडून विचार करीत होती. ' आतां काय करावं ?' देवानं ही संधी दिली आहे ती घालवतां कामा नये. कुंदेला दत्तांच्या घरीं घेऊन गेलें तर कमल हार देईल, मालकिणही कांहींतरी देईल, बाबूही तसेंच कांहीं तरी देतील. तिला देवेंद्रबाबूकडे नेऊन पोंचवलें तर रोख पैसा मिळेल !

' पण कां म्हणून तिला तिकडे नेऊं ? देवेंद्राला कुंदा इतकी सुंदर कां वाटते ? आम्ही आंगमेहनत करून चार घांस खातों—आम्हालाही सुग्रास भोजन मिळेल, चांगला उंची कपडालत्ता मिळेल तर आम्हीही नाहीं कां

तिच्यासारख्या दिसणार ? अन् या भ्रमिष्ट देवेंद्रबाबूचा उद्देश तरी कसा कळावा ? चिखल असल्याशिवाय पद्मफूल उमलत नाहीं. कुंद मिळाल्याशिवाय देवेंद्राचेंही मन फुलणार नाहीं. ज्याच्या नशिबीं जसं असेल तसं होईल ! मी कशाला उगीच कुणाचा हात धरूं ? प्रेमाबिमाच्या या भानगडी मला पटत नव्हत्या, पण देवानं माझी कसोटी पाहिली. दुसऱ्या घरचा चोर पकडायला जातांना माझाच जीव चोरीस केला. किती सुंदर आहे तो देवेंद्र ! किती मधुभाषी ! अन् तो मला म्हणे कुंद आणून दे ! हें काम सांगायला त्याला दुसरें कोण कसें मिळालें नाहीं ? असें वाटतें, मेल्याच्या नाकावर एक ठोसा लगावावा.

' नाहीं—कुंदेला देवेंद्राच्या हातीं कांहीं केल्या द्यायची नाहीं. ती आपली जुन्याच घरीं गेलेली बरी ! मग देवेंद्र वैष्णवीचं सोंग घेवो, कीं वासुदेवाचं सोंग घेवो, त्या घरांत त्याची दाद लागायची नाहीं !—पण कुंद जाईल कां तिथें ? ती नाहीं म्हणते ! दादा पुता ' करून कुणी स्वतः येऊन समजूत घातली तर जाईलही कदाचित् ! ती गेली तर—सूर्यमुखीची चांगलीच फजिती होईल.

' पण सूर्यमुखीवर माझा एवढा राग कां ? तिनें माझें कांहींच वाईट केलें नाहीं—कांहीं केलें असेल तर तें बरेंच. मला तिचा राग येतोय तो ती सुखी आहे अन् मी दुःखी आहें म्हणून ! ती मोठी आहे, मी छोटी आहें—ती धनीण आहें, मी नोकर आहें—म्हणूनच तिच्यावर माझा राग. मला तिचा मत्सर वाटतो आहे. देवानेंच मला मत्सरी घडवलें त्यांत माझा काय दोष ? मी कांहीं तिचें वाईट व्हावें म्हणून म्हणत नाहीं, पण तिचें वाईट होण्यानें माझें जर बरें होत असेल तर मी तसें कां करूं नये ? आतां मला चार पैसे गांठीला टाकले पाहिजेत. यापुढें किती दिवस नोकरी करायची ? पण पैसे मिळायचे कुठून ?

नगेंद्रबाबूंची नजर कुंदेवर गेली आहे असें सारे म्हणताहेत. बडा माणूस, मनाला येईल तसा वागेल—पण अडचण झाली आहे सूर्यमुखीची. दोघांत भांडण लागलें तरच कांहींतरी होईल. आतां तेंच केलें पाहिजे मला. ही कुंद आहे भोळी. मी आहें शहाणी. अगदीं सहज वश करीन या कुंदेला ! अगदीं

माझ्या बोटाभोंवतीं नाचायला लावीन. पाहूं आतां कसें जमतें तें ! दुर्गा दुर्गा ! कुंदेला नेऊन नगेन्द्राकडेसच द्यायची—पण चट्कन नाहीं !—आणखी कांहीं दिवस तिला लपवून ठेवायची. विरहानें प्रेम वाढतें म्हणतात—तसें त्याचें प्रेम पक्कें झालें कीं कुंदेला बाहेर काढायची—अन् मग सूर्यमुखीचें कपाळ नाहीं फुटलें तर तिचें नशीब शिकंदर म्हणायचें ! आतां आधीं कुंदेला चांगली बनवली पाहिजे अन् तेवढ्यासाठीं या आजीला कामारघाटला पाठवून दिली पाहिजे. नाहींतर यापुढें कुंदेला लपवून ठेवणं कठीण जाईल !'

पापी हिरेनें मनांत आणलें तसेंच करायला सुरवात केली. कांहींतरी निमित्त काढून तिनें आजीला घालवून दिलें आणि योग्य ती खबरदारी घेऊन कुंदेला आपल्या घरीं लपवून ठेवलें. तिची कळकळ आणि माया पाहून कुंदेला वाटलें, "हिरासारखी बाई मिळायची नाहीं. कमलनंसुद्धां माझी एवढी माय केली नाहीं !"



## —: २१ :—

● **कुंदेला** वश करतां येईल पण सूर्यमुखी आणि नगेंद्र यांचें चांगलेंच वितुष्ट आल्याशिवाय कांहीं केल्या कांहींच व्हायचें नाहीं, असें वाटल्यानें हिरा त्याच कामाला लागली.

एके दिवशीं पहांटे हिरा मालकाच्या वाड्यावर आली होती. कौसल्या नांवाची एक दासी होती. हिरा ही आपल्या वरचढ आणि मालकिणीची आवडती म्हणून ती तिचा मत्सर करी. हिरेला हें माहीत होतें. ती कौसल्येला म्हणाली, " कुशेआक्का, आज मला जरा बरं वाटत नाहीं. आज माझीं कामं तूं करशील का ?"

कौसल्या हिरेला भीत असे. ती म्हणाली, "हो, करीन तर ! सर्वांनाच कधींना कधीं आजारी पडावं लागतं—एका धन्याचे आम्हीं नोकर—कां काम करणार नाहीं ?"

कांहींतरी करून कौसल्येशीं झगडा करायचा असा हिरेचा बेत होता. ती

एकदम चिडून म्हणाली, " काय ग कुशे, भारीच मिजास वाढलेली दिसतेय तुझी ! शिवीगाळ करतेस मला ? "

कौसल्या अचंबित होऊन म्हणाली, " हें ग काय ? मी केव्हां गाळी दिल्या तुला ? "

हिरा म्हणाली, " नाहीं दिल्यास गाळी ? तूं आजारी पड असं नाहीं म्हणालीस मला ? हा काय आशीर्वाद झाला होय ? तूंच पड आजारी. मत्सरानं मरते आहे मेली ! तूंच मर एकदांची. मर ! मर ! मर ! "

कौसल्येला तें सहन झालें नाहीं. तीही भडकून उठली. ती म्हणाली, " मेले, दळभद्रे, काळतोंडे, लावसटे, तूंच मर आधीं. मी कशाला मरेन ? आधीं तूं मेलेली पाहीन तेव्हां यमाला हांक घालीन ! " झगडा करण्यांत हिरेपेक्षां कौसल्या जास्त वाकबगार होती. अर्थात हिरेनें पड खाल्ली.

हिरा मालकिणीपाशीं गेली. जात असतांना ती रागावलेली तर दिसत नव्हतीच. उलट गालांतल्या गालांत थोडीशी हंसतच होती. धनिणीसमोर जातांच मात्र तिनें रागाचा आव आणला. सुरवातीलाच तिनें बायकोचें अमोघ अस्त्र बाहेर काढलें. ती रडायला लागली. सूर्यमुखीनें फिर्यादी आणि आरोपी यांची जबानी घेऊन पाहिली तेव्हां हिरेचाच गुन्हा होता असें तिला वाटलें. पण ज्यावेळीं ' ह्या सटवीला घालवून द्या नाहींतर मी राहायची नाहीं. ' असें हिरा म्हणाली त्यावेळीं सूर्यमुखीलाही तिचा राग आला. ती म्हणाली, " फार झालं आहे तुझं कौतुक ! आधीं तूं शिवी दिलीस—चूक तुझी—अन् तिला काय म्हणून शिक्षा करूं ? मनाला वाटलं तर रहा. नाहींतर जा. "

हिराला हेंच हवें होतें, " ठीक आहे—चाललें. " असें म्हणून हिरा पदरानें डोळे पुशीत पुशीत धन्याकडे गेली.

बाबू बैठकखान्यांत एकटेच बसले होते. त्यांनीं विचारलें, " रडतेस कां हिरे ? "

हिरा म्हणाली, " माझा पगार चुकता करा. आईसाहेबांनीं मला काढून टाकलंय नोकरीवरून. कुशीनं मला शिव्या दिल्या, मी त्यांच्याकडे तक्रार नेली, त्यांनीं कुशीचं म्हणणं खरं मानलं अन् मला नोकरीवरून काढून टाकलं. "

नगेन्द्र हंसला आणि म्हणाला, “ तें कळलं मला. खरं कारण काय आहे तें सांग. ”

हिरा म्हणाली, “ मला इथं राहायचं नाहीं. बाईसाहेबांचं तोंड हल्लीं भारी सुटलंय. कुणाला काय बोलतील याचा नेम नाहीं. त्या दिवशीं कुंदादिदीला असंच टाकून बोलल्या. ती बिचारी घर सोडून निघून गेली. तसाच प्रसंग यायचा माझ्यावर. त्याआधींच जावं हें बरं. ”

“ तें काय झालंय तें मला सांग. ” नगेन्द्र म्हणाला.

हिरा म्हणाली, “ तुमच्यासमोर सारं कांहीं सांगायला मला शरम वाटतेय.”

नगेन्द्राचा चेहरा काळा ठिक्कर पडला. तो म्हणाला, “ आज तूं आपल्या घरीं जा. तुला उद्यां बोलावीन. ”

हिराचें काम झालें.

नगेन्द्र सूर्यमुखीच्या खोलींत गेला. हिरा पाय न वाजवतां त्याच्या मागोमाग गेली. सूर्यमुखी एकटीच आहे असें पाहून नगेन्द्रानें विचारलें, “ हिरेला घालवून दिलंस ? ” सूर्यमुखी ‘ होय ’ म्हणाली आणि झालेली सर्व हकिकत तिनें नगेन्द्राला सांगितली.

नगेन्द्र म्हणाला, “ मरो ती हिरा ! तूं कुंदनंदिनीला काय बोललीस ? ”

सूर्यमुखीचा चेहरा एकदम उतरला. ती म्हणाली,. “ काय बोललें मी ? ”

“ कांहीं वेडंवांकडं बोललीस तिला ? ” नगेन्द्रानें विचारलें.

क्षणभर स्तब्ध राहून नंतर सूर्यमुखी म्हणाली, “ तुम्ही–तुम्ही माझं सर्वस्व–तुमच्याकडे काय लपवूं ? मी कुंदेला टाकून बोललें खरी. मला क्षमा करा— मी सारं कांहीं सांगतें —“ असें म्हणून तिनें हरिदासी वैष्णवीची सर्व हकिकत त्याला तपशिलवार सांगितली आणि ती म्हणाली, “— मी तिला टाकून बोललें खरी, पण आतां मला त्याचा पश्चात्ताप होतो आहे. मला भ्रम झाला होता त्यावेळीं —” असें म्हणून तिनें त्याच्या पायावर लोळण घेतली.

नगेन्द्र म्हणाला, “ आतां मला कळलं. तुला माझा संशय आला होता. मी कुंदेवर अनुरक्त झालों असं तुला वाटलं होतं ! ”

“ काय सांगूं तुम्हाला ? ” सूर्यमुखी रडत रडत म्हणाली, “ मला किती

दुःख झालं तें तुम्हाला कळायचं नाहीं. नुसतं शब्दांनीं बोलायचं नव्हे, खरोखरच मला मरावंसं वाटतंय ! माझ्या अपराधाची मला क्षमा करावी."

एक सुस्कारा सोडून नगेन्द्र म्हणाला, " सूर्यमुखी, सारा दोष माझा आहे. तूं निर्दोष आहेस. खरोखरच तुला विसरून मी कुंदेला—काय बोलूं?—माझ्या मनांतल्या यातना कशा सांगूं? माझं मन मला आवरतां आलं नाहीं—मी पापी आहें—"

सूर्यमुखी त्याला थांबवून हात जोडून म्हणाली, " मनांत आलंय तें मनांतच ठेवा ! बोलूं नका. तुमचे शब्द माझ्या काळजाला झोंबताहेत. माझ्या नशिबीं होतं तसं झालं—"

" माझं ऐकून घे. " नगेन्द्र म्हणाला, " पुष्कळ दिवस बोलावं बोलावं म्हणून म्हणत होतों. आतां ही संधी आली आहे. या घरसंसारांत माझं मन रमत नाहीं. तुझा पती व्हायची माझी लायकी नाहीं. यापुढं इथं राहून मी तुला क्लेश देणार नाहीं. देशोदेशीं फिरून मी कुंदेचा शोध करणार. तूं इथंच रहा. हें घरदार ताब्यांत घे. कधीं कुंदेचा विसर पडला तरच मी परत येईन. नाहींतर तुझी माझी हीच शेवटची भेट. "

तो धक्का सूर्यमुखीला सहन झाला नाहीं. धरणीवर अंग टाकून ती रडत होती. तो जायला निघाला असें पाहून सूर्यमुखी त्याचे पाय धरून म्हणाली, " मला एकच भिक्षा घाला. आणखी एक महिना घरींच रहा. इतक्यांत कुंदनंदिनीचा शोध लागला नाहीं तर वाटेल तें करा. मी नको म्हणणार नाहीं."

नगेंद्र मुकाट्यानें बाहेर गेला. तो बोलला नाहीं, तरीही त्यानें तिची मागणी कबूल केली होती.

• •

## —: २२ :—

• **हिरेची** नोकरी गेली तरीही तिनें दत्तांच्या घराचा संबंध तोडला नव्हता. वाड्यावरचें कुणीही माणूस भेटलें तर त्याला पकडून ती तिकडील बातमी काढून घेत असे. एकादे दिवशीं बातमी मिळाली नाहीं तर कांहीं तरी निमित्त करून ती दत्तांच्या वाड्यांत एकदां फेरी मारून येई आणि नोकरांच्या मेळाव्यांत शिरून आडवेंतिडवें बोलून आपला उद्देश सिद्ध करून घेई.

अशा प्रकारें कांहीं दिवस गेले. एके दिवशीं कांहींतरी भानगड उपस्थित होण्याचा रंग दिसला—देवेंद्राशीं हिरेचा परिचय झाल्यापासून मालती गौळण हिरेच्या घरीं सारखे खेटे घालूं लागली होती. हिरेच्या घरांतील एक खोली सदोदित बंद असते हें मालतीनें हेरलें. एके दिवशीं मालती अचानक आली, त्यावेळीं दाराला बाहेरून कुलूप नव्हतें. मालतीनें दार उघडायचा प्रयत्न केला, पण आंतून कडी असल्यानें तें उघडलें नाहीं—अर्थात आंत कुणीतरी माणूस असावें असा तिनें कयास केला. हिरा भेटली तेव्हां मालती या बाबतींत तिच्याशीं कांहीं बोलली नाहीं.

मालतीला प्रश्न पडला—आंत कोण असावें? पुरुष कीं स्त्री? मालतीला सारें कांहीं माहीत होतें. कुंद नापत्ता झाल्याची बातमी मालतीला कळली होती. तिला वाटलें, आंत कुंद तर नसेल?

हा संशय दूर करण्यासाठीं तिनें एक उपाय योजायचें ठरवलें. हिरेनें धन्यांच्या वाड्यांतून एक हरणाचें पाडस आणलें होतें. तें फार अवखळ असल्यामुळें सदोदित बांधून ठेवलेलें असे. एके दिवशीं मालती त्या हरिणाला चारा चारीत होती. हिरेची नजर चुकवून तिनें त्याची दोरी सोडली, त्यासरशीं तें हरीण उड्या मारीत पळून गेलें.

हिरा त्याला पकडण्यासाठीं त्याच्यामागें धांवत सुटली.

हिरा दूर गेली असें पाहून मालतीनें एकदम विव्हळून रडायला सुरवात केली, "अग आईग! हिरे! हिरे! असं काय झालं ग माझ्या हिरेला?—" रडत रडत तिनें कुंदेच्या खोलीच्या दारावर थाप मारली आणि तशीच केविलवाणी ओरडत ती म्हणाली, "कुंदादिदी! धांवा हो धांवा! लवकर बाहेर या! ही हिरा बघा अशी काय करतेय!" कुंदेनें दार उघडलें आणि ती बाहेर आली. तिला पहातांच मालती ही ही करून हंसत पळून गेली.

कुंदेनें दार बंद करून घेतलें. हिरा आपल्याला दोष देईल या भीतीनें तिनें ती हकिकत तिला सांगितली नाहीं.

मालतीनें जाऊन देवेंद्राला ही बातमी दिली. हिरेच्या घरीं जाऊन या प्रकरणाचा एकदां पुरा छडा लावायचा असें देवेंद्रानें ठरवलें. त्या दिवशीं

त्याच्या घरीं 'पार्टी' असल्यामुळें त्याला जातां आलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं हिरेच्या घरीं जाऊन पहायचा त्यानें निश्चय केला.

● ●

## —: २३ :—

● कुंद त्यावेळीं पिंजऱ्यांतल्या पक्षासारखी चंचल झाली होती. इकडे सूर्यमुखीनें घरांतून तिला घालवून दिलें होतें. तिकडे प्रेमाच्या दोरीची ओढ तिला लागत होती. तिला वाटे, कां आपण घर सोडून निघालें ? तिथेंच राहिलें असतें तर रोज नगेंद्र दिसला असता तरी ! तिला वाटे, अपमानाची कल्पना सोडून देऊन पुन्हा तिकडेसच जावें. पुन्हा तिला वाटे, कुठल्या तोंडानें त्या घराच्या आंगणांत जाऊन उभें रहावें ? हिरा तरी आपल्याला एके दिवशीं जबरदस्तीनें ओढून नेईल तिकडे ?

तिचें मन नगेंद्राच्या दर्शनाची ओढ घेत होतें. त्या दिवशीं रात्रीं दोनप्रहर उलटल्यावर ती बिछान्यांतून उठली. हिरा झोंपी गेली होती. कुन्देनें हळुच दार उघडलें. बाहेर मिट्ट काळोख पडला होता. वारा झुळझुळ वहात होता. ती घराबाहेर निघाली. कुठेंतरी आड राहून एकदां नरेंद्राला डोळे भरून पहावें अशी तिची इच्छा होती. तो पहाटे उठत असे—नुसती नजर टाकायची आणि परतायचें.

ती पहांटेच्या सुमाराला नगेंद्राच्या घराकडे निघाली. उजाडायला विलंब होता. तिनें सर्वत्र डोकावून पाहिलें. तिथें नगेंद्र नव्हता. उजाडायची वाट पहात ती एका झाडाखालीं बसली. तिकडे अगदीं काळोख होता. पहाटेचा वारा वाहूं लागला होता. कुठें कुठें पक्षी नुकतेच किलबिल करूं लागले होते. नगेंद्र बगीच्यांत पहांटेला येत असे. तिथली दिंडी उघडी आहे असें पाहून ती आंत शिरली आणि बकुल वृक्षाच्या आड उभी राहिली.

त्या बगीच्याच्या मध्यभागीं एक लतामंडप होता. ती त्या लतामंडपांत डोकावून पाहूं लागली, तों तिथें एका संगमरवरी चबुतऱ्यावर कुणीतरी झोंपलें असलेलें तिला दिसलें. तिनें पुढें जाऊन पाहिलें—

तो नगेंद्र नव्हता—सूर्यमुखी होती. ती एकदम मागें हटली तोंच सूर्यमुखी उठून बागेंतील फुलें तोडूं लागली. कुंद लपल्याजागीं जेव्हां ती आली तेव्हां तिथें कुणीतरी माणूस दिसल्याचा संशय येऊन तिनें विचारलें, "कोण तें तिथं ?"

कुंदेची घाबरून दांतखिळ बसली. सूर्यमुखी जवळ आली— पहाते तों कुंद. तिनें चकित होऊन विचारलें, "कुंदच काय ग ती ?" तरीही तिनें उत्तर दिलें नाहीं.

सूर्यमुखीनें कुंदेचा हात धरला. ती म्हणाली, "ये ग बाई ये. आतां यापुढं मी तुला एक शब्दसुद्धां बोलायची नाहीं." असें म्हणून तिला घेऊन ती अंतःपुरांत गेली.



## —: २४ :—

● **त्याच** दिवशीं रात्रीं देवेंद्र दारू पिऊन हिरेच्या घरीं आला. त्यानें प्रत्येक खोलींत पाहिलें तों तिथें कुंद नव्हती. तोंडांत पदर घेऊन हिरा हंसू लागली. देवेंद्रनें चिडून विचारलें, "कां हंसते आहेस ?"

"तुमची फजिती बघून !" हिरा म्हणाली, "पिंजऱ्यांतला पक्षी पळून गेला. आतां कशाला इथली झडती घेतां ?"

हिरेनें देवेंद्राला सगळी हकिकत सांगितली आणि ती म्हणाली, "—आज पहांटे मी पाहिलं, ती इथं नव्हती म्हणून खूप तपास केला, पण पत्ता लागला नाहीं. बाबूंच्या वाड्यावर गेलें तों ती तिथं होती—फारच कौतुक होतंय तिचं तिथं."

देवेंद्र हताश होऊन जायला निघाला होता पण तितक्यांत थोडथोडा पाऊस पडूं लागला. तिथें छत्री नव्हती. शिवाय देवेंद्रनें तिथेंच घटकाभर बसावें अशी हिरेची इच्छा होती. देवेंद्र म्हणाला, "पाऊस जाईपर्यंत इथं बसलों तर कांहीं हरकत आहे का ?"

"आतां हरकत कसली !" हिरा म्हणाली, "भर रात्रीं तुम्ही इथं आलां तेंच चुकलं आधीं."

"तर मग बसतोंच इथं !" असें म्हणून देवेंद्रनें बैठक मारली. त्यानें खिशांतून ब्रँडीची बाटली काढली आणि तशीच तोंडाला लावली. त्याला कैफ चढत होता. तो हिराकडे पहात होता. पहातां पहातां तो म्हणाला, "फार सुंदर आहेत ग तुझे डोळे."

हिरा हळुच हंसली. शेजारीं एक जुनीं सारंगी पडली होती ती हातीं घेऊन त्यानें गज मारून पाहिलें. हळुहळु तो गाऊं लागला. हिराच्या हृदयांत खळबळ सुरू झाली. त्या आवेगाच्या भरांत तिनें अंतरींचा हेतू बोलून दाखविला. देवेंद्रानें तिच्यावर छाप टाकली होती. तिनेंही मनांतल्या मनांत आपले प्राण त्याला अर्पण केले होते.

आवेगाच्या भरांत हिरा बोलून गेली पण लगेच ती शुद्धीवर आली. घाबरी-घुबरी होऊन ती म्हणाली, "आधीं माझ्या घराबाहेर जा बघूं तुम्ही, नाहीं गेलांत तर मी जाईन—जातां कीं नाहीं? कीं बोलावूं लोकांना? माझा सत्यानाश करायला कशाला आलां आहां इथं?" हिराचें माथें फिरलें होतें.

"याला म्हणतात स्त्रीचरित्र!" देवेंद्र म्हणाला.

"स्त्रीचरित्र कसलं?" हिरा रागारागानें म्हणाली, "तुम्हा पुरुषांचींच चरित्रं घाणेरडीं. त्यांना कांहीं धर्म नाहीं, कर्म नाहीं, बऱ्यावाईटाची चाड नाहीं! स्वतःच्या सुखासाठीं कुणातरी स्त्रीचा सत्यानाश करण्यावर तुमची नजर! कशाला आलां माझ्या घरीं? मी कुलटा आहें असं का वाटलं तुम्हाला? आम्ही गरीब माणसं—आंग मोडून श्रम करून चार घांस खातों, कुलटा व्हायला सवड कुठं आहे आम्हाला?—" ती सारखी बोलत होती. देवेंद्र नुसता हंसत होता आणि मधून मधून तिला नुसता डोळा घालीत होता.

बोलतां बोलतां तिची वृत्ति बदलली. एकदम खालीं आवाज आणून ती म्हणाली, "मी कुलटा नाहीं—मी तुमच्यापायीं वेडी झालें आहें म्हणून तुम्हीं मला कुलटा समजूं नका. म्हणूनच मी तुम्हाला इथं राहून घेतलं. मी बसा म्हटलं खरं, पण तुम्ही कां बसलां? महापापी आहां तुम्हीं. कांहींतरी निमित्त करून माझा सत्यनाश करण्यासाठीं कशाला आलां इथं? आतां जा पाहूं इथून."

बाटलींतला एक घोंट घेऊन देवेंद्र म्हणाला, "छान ! छान ! फार सुंदर व्याख्यान दिलंस ! आमच्या ब्राह्मसमाजांत व्याख्यान देशील का एक दिवस?"

या त्याच्या थट्टेनें हिरा चिडली आणि म्हणाली, "मी एक खुळी भोळी दासी—मनापासून प्रेम केलं म्हणून बोललें—म्हणून का माझी थट्टा करतां ? मी धर्म मानीत नाहीं, तरी मी कुलटा नाहीं. तुमच्या प्रेमाच्या फंदांत पडून मी विकत डाग लावून घेणार नाहीं. जिथं तुमचं प्रेम नाहीं तिथं कशाला उगीच डाग लावायला येतां ? आतां मी सांगतें तें ऐका—ज्या दिवशीं तुम्हीं माझ्यावर खरोखरच प्रेम कराल त्या दिवशीं मी तुमची दासी होऊन राहीन ! मी तुमची चरणसेवा करीन."

देवेंद्रानें हिरेच्या तोंडचीं हीं तीन प्रकारचीं तीन भाषणें ऐकलीं. त्याला वाटलें, 'हिचं अंतरंग आपल्याला कळलं. आतां हिला कळीच्या पुतळीसारखी नाचवणं आपल्याला शक्य होईल.' असा निश्चित अंदाज करून तो निघून गेला.

देवेंद्राला हिरेची पुरी ओळख पटली नव्हती !



## —: २५ :—

**दोनप्रहरची** वेळ होती. श्रीशबाबू ऑफिसांत गेले होते. घरची सारीं माणसें जेवून झोंपी गेलीं होती. बैठकखान्याला कुलूप लागलेलें होतें. कमलमणी आपल्या खोलींत एकटीच बसली होती आणि मुलाबरोबर खेळत होती. ती सतूबाबूला म्हणाली, "माणसं ऑफिसांत कशाला जातात ?"

सतुबाबू 'हाम्' म्हणाला.

ती म्हणाली, "'हाम्' काय म्हणतोस ? तूं ऑफिसांत जाऊं नकोस. ऑफिसांत गेलास तर बायको दुपारच्यावेळीं घरीं रडत बसेल."

सतुबाबू आपल्या परीनें तिला उत्तर देत होता आणि ऑफिसांत गेलेल्या नवऱ्याच्या रागानें ती सतुबाबूला खिजवून बोलत होती. इतक्यांत एका दासीनें एक पत्र आणून तिच्या हातीं दिलें. तें सूर्यमुखीचें पत्र होतें. ती उघडून वाचूं लागलीः—

" कलकत्त्याला जाऊन मला विसरलीस—नुसतं एकच पत्र लिहून कां थांबलीस ? तुझी खबर कळावी म्हणून मी सदोदित उत्सुक असतें. तूं कुंदेबद्दल विचारलें होतेंस. कुंद सांपडली — ती इथेंच आहे—ऐकून तुला आनंद होईल. आतां तिच्यासाठीं केलेले नवस फेड. आणखी एक आनंदाची बातमी आहे— कुंदेबरोबर माझ्या पतीचें लग्न व्हायचें आहे. मीच ही मध्यस्थी केली. शास्त्रांत विधवाविवाहाला आधार आहे. एक दोन दिवसांत लग्नविधी होईल. सध्यां तुला येणें शक्य होणार नाहीं—नाहींतर मी तुला निमंत्रण दिलें असतें. शक्य तर फुलशय्येच्या दिवशीं यायचा प्रयत्न कर. तुझ्या भेटीसाठीं मी फार उत्सुक झालें आहें. "

पत्र वाचून कमलमणी बुचकळ्यांत पडली. ती सतूबाबूला विचारूं लागली. बिचारा सतूबाबू तरी काय सांगणार होता ? ज्यांना विचारायचें ते अजून ऑफिसांतून आले नव्हते. त्यांची वाट पहात रहाणें भाग होतें.

योग्य वेळीं श्रीशचंद्र ऑफिसांतून आला. नित्याप्रमाणें त्याला खायला प्यायला घालून सतीशला घेऊन ती खाटेवर झोंपून राहिली. ती रागावलेली आहे असें पाहून हुक्का घेऊन तो दूर एका कोचावर जाऊन बसला. हुक्क्याला साक्षी ठेवून म्हणाला, " हे हुक्के ! तुझ्या पोटांत आहे गंगाजल, माथ्यावर आहे विस्तव, तूंच साक्षी—माझ्यावर जें माणूस राग धरून बसलंय तें जर माझ्याबरोबर बोललं नाहीं, तर तुझ्या माथ्याला आग घालून मी दहा चिलम्या तंबाकू खाक करून टाकीन ! "

तें ऐकतांच कमलमणी उठली अन् रागाचा खोटाच आव आणून तिरप्या नजरेनें त्याच्याकडे पहात म्हणाली, " मला सतावलंय या तुमच्या चिलमीनं ! आणि म्हणे दहा चिलम्या तंबाकू ओढीन ! माझे हात काय मोडलेयत ?—" असें म्हणून ती ताडकन उठली आणि चिलमींतला तंबाकू तिनें आगीसकट उडवून दिला. लगेच सूर्यमुखीचें पत्र त्याच्या हातीं देऊन म्हणाली, " याचा अर्थ सांगा, नाहींतर मंत्रीमहाशयांचा पगार कापला जाईल. "

श्रीश म्हणाला, " एक महिन्याची मुदत दे, कीं अर्थ लावून देतों—ही थट्टा आहे सारी ! "

" कुठली ? " तिनें विचारलें, " तुमचं भाषण, कीं हें पत्र ? "

" हें पत्र ! "

" मंत्रीमहाशयांना डिस्चार्ज करण्यांत येत आहे !—कांहीं कळतं का ? बायकांची जात कधीं असली थट्टा करते का ? मला वाटतं, दादा जबरदस्तीनं हें लग्न करतोय. "

श्रीशचंद्र क्षणभर विचार करून म्हणाला, " मला कांहीं अंदाज येत नाहीं. नगेन्द्रला पत्र लिहूं का ? "

कमलमणीला तें पटलें. श्रीशचन्द्रानें थट्टेचा आव आणून नगेन्द्राला पत्र लिहिलें. नगेन्द्राचें उत्तर आलें तें असें:—

" भाई ! माझी घृणा करूं नकोस !—पण असं म्हणूं तरी कसं ? घृणास्पद आहे त्याची कुणीही घृणा करणारच. मी हें लग्न करणार. जगांतल्या साऱ्या माणसांनीं जरी मला दूर लोटलें तरीही मी हें लग्न करणार. तसं केलं नाहीं तर मला वेड लागेल. एवढं मी लिहिल्यावर तुम्ही दोघें मला परावृत्त करण्याचा प्रयत्न करणार नाहीं ! विधवाविवाहाला विद्यासागर महाशयासारख्या मोठ्या पंडितानें संमती दिली आहे. तुम्ही म्हणाल, ही गोष्ट शास्त्रसम्मत असली तरी समाजसंमत नाहीं. या विवाहामुळें मी समाजच्युत होईन ! माझें उत्तर असें आहे—या गोविंदपुरांत मला वाळींत टाकायची कुणाची छाती आहे ? जिथें मी म्हणजेच समाज, तिथें समाजच्युति होणार कशी ? तरीपण तुम्हा लोकांची समजूत घालण्यासाठीं मी ही लग्नाची बातमी गुप्त ठेवीन. कुणाला कळूं देणार नाहीं. तूं म्हणशील, दोन लग्नें नीतिविरुद्ध आहेत—कोण म्हणतो असें ? ही अक्कल तुम्हीं लोकांनीं घेतली आहे इंग्रजांपासून. भारतवर्षांत ही अनीती नाहीं. पुष्कळशा लोकांचें ज्यांत अनिष्ट असतें ती गोष्ट नीतिविरूद्ध ठरते. माझ्या या दुसऱ्या विवाहामुळें कुठल्या अधिकांश लोकांचें अनिष्ट होणार आहे ? तूं म्हणशील, यामुळें गृहकलह होईल ! कसा होणार ? मी निसन्तान आहें. माझ्यामागें माझ्या पितृकुलाचें नांव लुप्त होईल. या लग्नामुळें मला कदाचित् संतान व्हायचा संभव आहे.—हें सयुक्तिक

नाहीं का ?—शेवटची अडचण—सूर्यमुखी ! तिला सवतीचा जाच कां ? उत्तर—सूर्यमुखीचा या विवाहाला विरोध नाहीं. तिनेंच स्वतः हें सुचवलें—लग्न जुळवून आणलें तें तिनें. मग आतां कसली अडचण राहिली ?—आतां सांग, कोणत्या कारणास्तव हें लग्न निंदनीय म्हणणार तूं ? ”

● ●

## —: २६ :—

● **कमलमणीनें** पत्र वाचलें. ती म्हणाली, “ कोणत्या कारणानें हें लग्न निदनीय ठरतं ? देव जाणे ! काय हा भ्रम ! पुरूषाच्या जातीला कांहीं कळतच का नाहीं ? ठीक आहे ! मंत्रीमहाशय, आपणाला गोविदपूरला गेलं पाहिजे. ”

“ हें लग्न मोडून घालणार का तूं ? ” श्रीशनें विचारलें.

“ तसं नाहीं झालं तर दादासमोर नाक आपटून जीव देईन. ” कमल म्हणाली.

“ तें शक्य नाहीं.” श्रीश म्हणाला, “ नाक आपटायच्याऐवजीं नव्या भावजयींचं नाक कापून आणतां येईल. चल, हाच बेत करून जाऊं.”

दुसऱ्या दिवशीं तीं दोघेंही गोविंदपूरला जाऊन पोंचलीं. कमलमणी धडधडत्या छातीनें अंतःपुरांत गेली. आंत पाऊल टाकतांच तिनें मन घट्ट करून घेतलें आणि विचारलें, “ सूर्यमुखी कुठं आहे ? ”

ती सारखी भीत होती. तिला वाटे, कुणीतरी म्हणेल, ‘ लग्न लागून गेलं ! ’ —कुणी असेंही म्हणेल, ‘ त्या धक्क्यानं सूर्यमुखी मेली ! ’

दासीनें सांगितलें, “ सूर्यमुखी आपल्या शेजघरांत आहे. ”

कमल धांवतच शेजघरांत गेली. पहिल्यानें तिला आंत कुणी दिसलें नाहीं. तिनें निरखून पाहिलें—एका झांकलेल्या खिडकीपाशीं खालीं मान घालून एकजण बसली होती. कमलनें ओळखलें—ती सूर्यमुखी होती.

सूर्यमुखीला पहातांच तिच्या काळजांत धस्स झालें. ती अगदीं रोड झाली

होती. डोळे खालीं गेले होते. देहाची धनुकली झाली होती. कमलमणीला वाटलें, लग्न झालें असावें. तिनें हळुच विचारलें, " केव्हां झालं ? "

सूर्यमुखी पुटपुटली, " काल."

दोघीही मुकाट बसल्या होत्या. दोघींही सारख्या रडत होत्या. एकीच्याही तोंडून शब्द बाहेर फुटत नव्हता. एकदम उमाळा येऊन सूर्यमुखीनें कमलला मिठी मारली आणि तिच्या कुशींत मान खुपसून ती उसासे टाकून रडूं लागली.

त्याचवेळीं नरेंद्र बैठकखान्यांत बसला होता. तो कसला विचार करीत होता ? तो आपल्याशींच म्हणत होता, " कुंदनंदिनी ! माझी कुंद ! माझी पत्नी कुंद ! कुंद ! कुंद ! कुंद ! ती माझीच !—माझीच ती ! "

श्रीशचंद्र येऊन त्याच्या जवळ बसला. बराच वेळ कुणीच कांहीं बोललें नाहीं. श्रीशला नगेंद्रचें पत्र आठवलें, " सूर्यमुखीनंच जर हें लग्न ठरवलं आहे तर इतरांनीं विरोध कां करावा ? "

● ●

## —: २७ :—

● **त्या** दिवशीं संध्याकाळीं दोघींचींही मनें स्थिरावलीं होतीं. दोघीही आतां मोकळ्या मनानें बोलायला तयार झाल्या होत्या. कमल म्हणाली, " हे म्हणतात, तूंच हें लग्न घडवून आणलंस ! आपलीच चिता आपण कां रचलीस ? "

सूर्यमुखी बळेंबळेंच हंसली आणि म्हणाली, " मी कोण लग्न लावणार ! एकदां तूं आपल्या भावाला पाहून घे. आनंदानं उजळून उठला आहे त्याचा चेहरा ! केवढं समाधान वाटलंय त्यांना ! त्यांच्या समाधानांतच माझ्या जीवनाचं सार्थक नाहीं का ? "

" पण तूं सुखी झाली आहेस का ? " कमलनें विचारलें.

" माझं कशाला विचारतेस ? " सूर्यमुखी म्हणाली, " अशी कोण मी ! पतीच्या पायाला खडा टोंचू नये म्हणून मी स्वतः वाटेवर आडवी पडेन अन् त्यानीं माझ्यावर पाय देऊन पलिकडे जावं. "

सूर्यमुखी क्षणभर स्वस्थ बसली होती. डोळ्यांतल्या आसवांनीं तिची साडी भिजली होती. तिनें एकदम वर पाहिलें आणि विचारलें, " कमल, कुठल्याशा देशांत मुलगी जन्माला आली कीं तिला मारून टाकतात ना ग ? "

तिचा उद्देश ध्यानीं येऊन कमल म्हणाली, "मुलीचा जन्म आला म्हणून काय झालं ? जसं ज्याचं नशिब, तसंच घडत असतं शेवटीं."

सूर्यमुखी म्हणाली, "माझं नशीब काय वाईट होतं ? केवढी भाग्यवती होतें मी! कुणाला असा पती लाभला होता का कधीं? रूपानं, गुणानं, ऐश्वर्यानं एवढा मोठा असलेला ?—माझं नशीब केवढं जोराचं—मग हें असं काय झालं ?"

"हेंही नशिबच !"

"तर मग मनांत हा असा जाळ कां पेटलाय ?"

"तूंच म्हणतेस, कीं त्याचा आनंदी चेहरा पाहून तुला समाधान वाटतंय—अन् तूंच म्हणते आहेस, कीं आंतून जाळ पेटतोय ! यांतलं खरं कुठलं ?"

"दोन्हीही खरींच !" सूर्यमुखी म्हणाली, "त्यांच्या सुखानं मी सुखी झालें, पण त्यांनीं मला लाथ मारली.—मला लाथ मारली म्हणूनच त्यांनां एवढा आल्हाद झाला आहे—" तिच्यानें पुढें बोलवेना. तिचा गळा दाटून आला. डोळे भरून आले.—तिचें अपुरें भाषण कमलमणीला कळलें.

कमल म्हणाली, "तुला त्यांनीं लाथ मारली म्हणून तुझा जीव आंतून पेटतोय, मग 'मी कोण ?' असं कां म्हणतेस ? अजूनही तुझा मीपणा जागा आहे. कळूनसवरून त्याग केल्यावर का तुला पश्चात्ताप होतो आहे ?"

"हा पश्चात्ताप नव्हे." सूर्यमुखी म्हणाली, "मी केलं तें योग्यच केलं. मरणांतसुद्धां यातना असतेच. आतां मरणच बरं म्हणून मी स्वतःच्या हातांनीं मेलेंय. पण असं हें मरण येतांना मी तुझ्यासमोर रडूंसुद्धां नये ?"

सूर्यमुखी रडूं लागली. कमलनें तिला जवळ घेऊन कवटाळलें. तोंडाच्या बोलानें कांहीं हृदयाची व्यथा व्यक्त होत नाहीं. हृदयाला हृदय भिडलें तेव्हां ती सारी भाषा एकमेकींना कळली.

त्या दोघींनींहीं डोळे पुसून घेतले. सतीशला जवळ घेऊन सूर्यमुखी त्याचें कोडकौतुक करूं लागली. नंतर घरच्या गोष्टी निघाल्या. श्रीशचन्द्राच्या ऑफिसच्या गोष्टी निघाल्या.

पुन्हां सतीशच्या बाललीलांच्या गोष्टी निघाल्या तेव्हां सूर्यमुखी सतीशला हृदयाशीं धरून म्हणाली, "आपल्या मामासारखाच गुणी हो बाळा. यापेक्षां जास्त मोठा आशीर्वाद मी कुठला देऊं तुला !"

सूर्यमुखी स्वाभाविकपणें बोलत होती खरी, पण तिच्या आवाजांत आलेली एक विचित्र छटा जाणवल्यामुळें कमलमणी दचकली आणि म्हणाली, "तुझ्या मनांत काय आलंय वैनी ? सांग ना ?"

"कांहींसुद्धां नाहीं !" सूर्यमुखी म्हणाली. "तुझ्यापासून लपवून ठेवीन असं कांहींच नाहीं माझ्यापाशीं."

सूर्यमुखीनें असें म्हटलें तेव्हां कमल निश्चित मनानें आपल्या शेजघरांत गेली.

पण सूर्यमुखीनें खरोखरच एक गोष्ट तिच्यापासून लपवली होती, ती दुसऱ्या दिवशीं सकाळींच तिला कळून आली. सकाळीं उठून ती सूर्यमुखीच्या शेजघरांत गेली, पण तिथें सूर्यमुखी नव्हती. तिचा बिछाना तसाच होता. त्या बिछान्यावर एक पत्र पडलें होतें. तें पत्र पाहातांच कमलमणीला चक्कर आली. तें पत्र तिच्यानें वाचवेना. तिला वाटलें, सूर्यमुखी निघून गेली. तिनें तें पत्र हातांत घेऊन चुरगळलें. कपाळावर हात मारून घेऊन ती मट्कन् खालीं बसली. ती उद्गारली, "केवढी पागल मी ? कालच मला हें कळायला हवं होतं !"

शेजारीं सतीश होता. आपली आई कपाळावर हात घेऊन रडते आहे असें पाहून तोही रडूं लागला.

## —: २८ :—

**दुःखाचा** पहिला वेग ओसरल्यावर कमलमणीनें पत्र वाचायला सुरवात केली:—

"कुंदनंदिनीशिवाय आपण जगणार नाहीं असें ज्या दिवशीं माझ्या पतीच्या तोंडून मी ऐकलं त्या दिवशींच मी ठरवलें होतें, कीं ती सांपडतांच तिला माझ्या पतीच्या हवालीं करून घर सोडावें. कुंद त्यांची झालेली पाहाणें मला शक्य नव्हतें. आतां तो माझा उद्देश पुरा केल्यामुळें मी घर सोडून निघालें आहें. तुझी भेट व्हावी अशी इच्छा होती म्हणूनच तुला मी बोलावून घेतलें होतें. आतां माझ्या दोन्हीही इच्छा पुऱ्या झाल्या आहेत. हें पत्र तुझ्या हातीं पोंचेल तेव्हां मी बरीच दूर

गेलेली असेन. तुम्ही कोणी माझा तपास करूं नका. जातांना चार पैसे घेऊन जाणें मला शक्य होतें, पण मी आतां भीक मागत देशपर्यटण करायचें ठरवलें आहे. पतीचा त्याग करून निघालें ती काय सोनेंरूपें घेऊन जाण्यासाठीं ? माझ्या पतीला माझे कोटी कोटी प्रणाम सांग. मी त्यांचा कायमचा निरोप घेत आहें तरीही जन्मभर मी त्यांना विसरणार नाहीं. तुलाही हाच निरोप. तुझे पतिपुत्र दीर्घजीवी होवोत—तूंही चिरसुखी हो आणि पतीच्या प्रेमापासून तूं कधींही वंचित न होओस असा माझा आशीर्वाद आहे. मला मात्र कुणी असा आशीर्वाद दिला नव्हता."

• •

## —: २१ :—

● ज्या विषवृक्षाच्या इतिहासासाठीं ही कथा लिहिली जात आहे त्याच्या विषबीजाचें रोपण प्रत्येकाच्या घराच्या अंगणांत झालेलें असतें. वैऱ्याचें प्राबल्य हेंच त्याचें बीज. त्याला अंकूर फुटतो तो घटनेच्या अनुरोधानें. रागद्वेषापासून अलिप्त असलेला असा कुणीही माणूस नाहीं. ज्ञानी व्यक्ति देखील घटनाधीन होऊन वैऱ्याच्या कर्तृत्वानें विचलित होतात. माणसामाणसांत भेद असतो. कुणी आपल्या उच्छृंखल वृत्ती आवरूं शकतात आणि आवरूनही ठेवतात--ते असतात महात्मे. ज्यांना हा संयम करतां येत नाहीं त्यांच्याच घरीं विषबीजाला अंकूर फुटतो. चित्तसंयमाचा अभाव हाच तो अंकूर आणि त्यामुळेंच तो वृक्ष वाढतो, हा वृक्ष महा तेजस्वी असतो. एकदा तो बळावला कीं मग तो नष्ट होणें अशक्य असतें. दिसायला मोठा सुंदर असतो हा वृक्ष, पण त्याचें फळ असतें विषारी. जो तें फळ खातो तो हटकून मरतो.

मूळ मातीच्या भिन्नपणामुळें या वृक्षाचीं फळेंही भिन्न स्वरूपाचीं होत असतात. पात्रविशेषाप्रमाणें, केव्हां रोग तर केव्हां शोक, अशा स्वरूपाचींही नानाप्रकारचीं फळें या वृक्षाला येतात.

चित्ताचा संयम करण्यासाठीं पहिल्यानें चित्तसंयमाची 'प्रवृत्ती' असावी लागते. नंतर चित्तसंयमाची 'शक्ति' आवश्यक असते. शक्ति असते ती

प्रकृतीजन्य आणि प्रवृत्ति असते ती शिक्षणजन्य. ती प्रकृतीसुद्धां शिक्षणावरच अवलंबून असते. अर्थात चित्तसंयमाला मूळ आवश्यकता असते ती शिक्षणाची. शिक्षण म्हणजे नुसता गुरूपदेश नव्हे—तर दुःख भोगून अंतःकरण बळकट बनवणें, हेंच असतें मुख्य शिक्षण.

नगेंद्राला हें शिक्षण कधींच लाभलें नव्हतें. सर्व प्रकारच्या सुखांचा धनी करून ईश्वरानें त्याला पृथ्वीवर पाठवलें होतें. रूप, ऐश्वर्य, निरोगी शरीर, सर्वव्यापी विद्या, सुशील चरित्र आणि स्नेहमयी साध्वी स्त्री—अशी सारीच जोडी जमणें एकाच माणसाच्या भाग्यीं नसतें. नगेंद्राला तें भाग्य लाभलें होतें. एवढ्या सुखाचा ठेवा पहिल्यापासूनच त्याला मिळाला नसता तर पुढें एवढें दुर्धर दुःख भोगण्याचें त्याच्या नशिबीं आलें नसतें.

दुःख भोगल्याशिवाय माणूस निर्लोभ होत नाहीं. ज्याला ज्या वस्तूचा अभाव असतो त्यालाच त्या वस्तूचा लोभ सुटतो. कुंदनंदिनीला आशाळभूत डोळ्यांनीं पहायच्यापूर्वी नगेंद्र केव्हांही या लोभांत सांपडला नव्हता. कारण यापूर्वी त्याला कसलाच अभाव नव्हता. सर्व कांहीं सुलभ होतें. अर्थात लोभाची प्रवृत्ती आवरायला जो मानसिक अभ्यास अवश्य असतो त्याची त्याला ओळख नव्हती. म्हणूनच चित्तसंयम करावा अशी प्रवृत्ती असतांनाही त्याला तें अशक्य झालें.

अविच्छिन्न सुख हें दुःखाचें मूळ आहे. पूर्वगामी दुःखाशिवाय सुख स्थायी होत नाहीं.

नगेंद्र निर्दोष होता असें कांहीं नव्हे. त्याचा दोषही फार मोठा होता—अर्थात प्रायश्चित्ताचा आरंभही तशाच मोठ्या स्वरूपांत झाला.

● ●

## —: ३० :—

● **सूर्यमुखीच्या** तपासासाठीं चोंहींकडे लोक पाठवण्यांत आले होते. पहिल्यानें श्रीशचंद्र, नगेंद्र आणि कमल यांना वाटलें होतें, कीं तिला पायपीट करायची संवय नव्हती, जाऊन जाऊन किती दूर जाईल? कुठें तरी पाव अर्ध्या कोसावर जाऊन बसकण मारली असेल तिथें ती सांपडेल, अशी त्यांची अपेक्षा

होती. दोन तीन तास गेले, तरी तिची खबर लागली नाहीं तेव्हां नगेंद्र स्वतः तिच्या शोधासाठीं निघाला. त्यालाही पत्ता लागला नाहीं. त्याला वाटलें होतें, कीं आपण शोधार्थ निघालों त्याच वेळीं कदाचित ती घरीं परत गेली असेल, पण तो परत आला तेव्हां ती घरीं आली नाहीं असें पाहून तो पुन्हा तपासासाठीं बाहेर निघाला आणि शेवटीं निराश होऊन परत आला.

श्रीशचंद्र म्हणाला होता तें खरें होतें. सूर्यमुखीला पायपीट करणें शक्यच नव्हतें. अर्धा कोस वाटचाल केल्यावर ती एका पुष्करणीच्या कांठाला असलेल्या आमराईंत थकून झोंपीं गेली होती. वाड्यांत जाणाऱ्या एका माणसानें ती तिथें पडलेली असलेली पाहिली. त्यानें तिला पुन्हा वाड्यांत येण्याबद्दल विनंती केली त्यावेळीं ती म्हणाली, " मला घरीं जा म्हणून हुकूम करणारा तूं कोण ?—" तो घाबरून तसाच उभा राहिला, तिथून जाईना तेव्हां ती म्हणाली, " तूं असाच इथं उभा राहिलास तर मी पुष्करणींत उडी घेऊन जीव देईन. "

त्या माणसानें धांवत जाऊन नगेंद्रला खबर दिली. नगेंद्र मेणा घेऊन स्वतः त्या जागीं आला त्यावेळीं सूर्यमुखी तिथें नव्हती. आसपास शोध करूनही ती सांपडली नाहीं.

तो माणूस निघून गेल्यावर ती एका जंगलांत शिरली होती. तिथें लांकडें तोडायला आलेल्या एका म्हातारीची आणि तिची भेट झाली. इनामाच्या आशेनें तिनें सूर्यमुखीला विचारलें, " तुम्ही आमच्या जमीदार-बाईच ना ? " सूर्यमुखी ' नाहीं ' म्हणाली तरीही ती म्हातारी पुन्हा पुन्हा तोच प्रश्न विचारूं लागली असें पाहून सूर्यमुखी म्हणाली, " तुला भ्रम झाला आहे म्हातारे. माझ्या अंगावर सोन्याचा फुटका मणीसुद्धां नाहीं. अशी कंगाल असते का जमीदारबाई ? "

म्हातारीला तें तिचें म्हणणें पटलें आणि ती तिथून निघून गेली.

सारा दिवस अशा प्रकारें फुकट गेला. जे पुरुषमाणूस तपासाला निघाले होते ते सूर्यमुखीला ओळखीत नव्हते आणि ज्या स्त्रियांनीं तिला पाहिलें होतें त्या जाऊन जाऊन किती दूर जाणार होत्या ? भलतींच माणसें भलत्याच व्यक्तीला सूर्यमुखी समजून नगेंद्रकडे घेऊन जात होतीं आणि शेवटीं त्याला निराश व्हावें लागत होतें.

श्रीशचंद्र कलकत्त्याला जाऊन तपास करूं लागला आणि कमलमणी गोविंद-पूरलाच राहून सूर्यमुखीच्या शोधाचा प्रयत्न करीत होती.

• •

## : ३१ :

● **कुंदनंदिनीला** अनेपक्षित असा सुखाचा ठेवा लाभला होता. ती नगेंद्राची पत्नी झाली होती. लग्न झालें त्या दिवशीं तिला वाटलें, या सुखाला सीमा नाहीं कीं परिमाण नाहीं. त्यानंतर सूर्यमुखी निघून गेली. कुंदला पश्चात्ताप झाला. तिला वाटलें, सूर्यमुखीनें आपल्या संकटकालीं आपल्याला हात दिला, नाहींतर आपण कुठें जाणार होतें ?—पण आज कुंदेच्यापायीं तीच गृहत्यागी झाली होती. कुंदेला वाटलें, या सुखापेक्षां मरण बरें. सुखालाही सीमा आहे.

रात्रीं शेजघरांत कुंद नगेंद्राच्या उशापाशीं बसून वारा घालीत होती. दोघेंही बोलत नव्हतीं. दुसरें कुणी नव्हतें तरीही दोघेंही तोंड बंद करून बसलीं होतीं. हें संपूर्ण सुखाचें का लक्षण ? सूर्यमुखी निघून गेल्यामुळें संपूर्ण सुख कसें लाभणार होतें ? कुंदेनें धीर करून विचारलें, " पूर्वी जसं होतं तसंच व्हायला काय करायला हवं ? "

नगेंद्र तिरसटून म्हणाला, " पूर्वी होतं तसं होय ? माझ्याशीं लग्न केल्या-बद्दल तुला पश्चात्ताप का होतोय ? "

तें ऐकून कुंदनंदिनीला दुःख झालें. ती म्हणाली, " माझ्याशीं लग्न करून तुम्ही मला सुखी कराल असं मला कधींच वाटलं नव्हतं. मी तसं म्हणत नाहीं—मी विचारतेंय, सूर्यमुखी परत येईल कशी ? "

नगेंद्र म्हणाला, " सूर्यमुखीचं नांव तुझ्या तोंडून निघालेलं ऐकलं तर माझ्या अंगाचा तिळपापड होतो. केवळ तुझ्यापायींच सूर्यमुखी मला सोडून गेली. "

तें खरें होतें—कुंदेलाही तसेंच वाटत होतें, पण नगेंद्राच्या तोंडून तसे उद्गार निघाल्याचें ऐकून मात्र तिला दुःख झालें. तिला रडूं कोसळलें. ती तिथून उठली आणि हळु हळु बाहेर जायला निघाली तेव्हां नगेंद्र म्हणाला,

" रागावलीस का ?" ती मानेनेंच 'नाहीं' म्हणाली त्यावेळीं तो म्हणाला, " माझ्यावर तुझं प्रेमच नाहीं का ?"

ती म्हणाली, " आहे तर काय !"

" आहे तर काय !" नगेंद्र म्हणाला, " हें काय बोलणं झालं ? मला वाटतं, माझ्यावर तुझं कधींच प्रेम नव्हतं."

" अगदीं पुरेपूर होतं." कुंद म्हणाली.

नगेंद्रला तें उत्तर पटलें नाहीं.

सूर्यमुखीसारखें प्रेम करायला कुंद असमर्थ होती असं नव्हे, पण ती पोरसवदा होती, भित्री होती, बोलावें कसें हें तिला कळत नव्हतें—नगेंद्र म्हणाला, " सूर्यमुखीचंच प्रेम होतं माझ्यावर ! माकडाच्या गळ्यांत मोत्याचा हार काय कामाचा ? तिथं लोखंडी सांखळीच हवी !"

आतां मात्र पराकाष्ठा झाली. ती रडत रडत बाहेर गेली. रडून मन मोकळें करायला तिथें दुसरें कुणीच माणूस नव्हतें. कमलमणी आल्यापासून कुंद केव्हांच तिच्यापाशीं गेली नव्हती. आज मात्र तिला कमलकडे धांव घ्यावी असें वाटलें.

आतां ती पूर्वीची कमल राहिली नव्हती. कुंदेला पहातांच तिनें तोंड वाकडें केलें. कुंद तिच्यापाशीं जाऊन रडूं लागली, तरीही कमल कांहीं बोलली नाहीं, कीं तिनें तिला कांहीं विचारलेंही नाहीं. 'मला काम आहे' असें म्हणून कमलमणी तिथून निघून गेली.

कुंदनंदिनीला कळून चुकलें, कीं सर्व प्रकारच्या सुखांनाही सीमा आहे.

सूर्यमुखीवर आपलें किती प्रेम होतें तें ती निघून जाईपर्यंत नगेंद्रनाथला कळलें नव्हतें. आतां त्याला त्या प्रेमाच्या आत्यंतिकतेची जाणीव पूर्णपणें होऊं लागली होती. तिची भेट होण्यासाठीं तो व्याकुळ झाला होता. कुंदनंदिनीचा कोणताच अपराध नव्हता, पण नगेंद्राला ती आतां दृष्टीसमोर-सुद्धां नकोशी झाली होती. जिच्यासाठीं सूर्यमुखीलाही टाकायला नगेंद्र तयार झाला होता, तीच आतां त्याला वैऱ्यासारखी वाटत होती.

तो निष्कारण तिच्यावर तोंड टाकी. ती तरी काय करणार होती ?—मुकाट्यानें रडण्यापलीकडे तिला काय करतां येणार होतें ? नगेंद्रनाथला वाटलें, कीं

अशा परिस्थितींत रहाणें कांहीं चालणार नाहीं. सूर्यमुखीच्या शोधासाठीं त्यानें देशपर्यटण करायचा निश्चय केला. तिचा शोध लावल्याशिवाय घरीं परत यायचें नाहीं अशी त्यानें प्रतिज्ञा केली.

जमीदारीचा कारभार चालवायचा सर्व भार दिवाणजीवर टाकून तो घर सोडून निघाला.

यापूर्वींच कमलमणी कलकत्त्याला गेली होती. एकटी कुंदनंदिनीच काय ती तिथें राहिली होती आणि हिरा दासी तिची काळजी वहात होती.

जमीदार दत्तांचा तो अफाट वाडा ओस पडला होता. नाटक संपल्यानंतर नाटकगृह जसें अंधारमय, जनशून्य आणि मुकाट होतें, तीच कळा आज दत्तांच्या वाड्यावर आली होती. एकादें मूल एकादी बाहुली मोठ्या उल्हासानें घेऊन घटकाभर खेळतें बागडतें, ती बाहुली मोडून फेंकून देतें आणि मग ती बाहुली मातींत मिसळून जाते, तसेंच आज कुंदनंदिनीचें झालें होतें. त्या प्रचंड वाड्यांत कुंदनंदिनी फुटक्या बाहुलीसारखी पडून राहिली होती.

सूर्यमुखीच्या शोधासाठीं नगेंद्र गांवामागून गांवें पालथीं घालीत होता. अफाट दर्यांत लहानसा मणी शोधीत बसण्यासारखाच तो त्याचा प्रयत्न होता.



## —: ३२ :—

● **कुंदनंदिनीला** गोविंदपूरला ठेवून नगेंद्र ज्यावेळीं देशांतराला जायला निघाला, त्यावेळीं हिरेनें पुन्हा आपल्याला दासी म्हणून ठेवून घेण्यासाठीं नगेंद्राकडे विनंती केली. कुंदनंदिनीच्या सोबतीसाठीं कुणीतरी हवीच होती म्हणून त्यानें हिरेला त्या कामावर नेमलें.

हिरा ही एक सामान्य दासी होती. देवेंद्राकडे तिचें मन ओढ घेत होतें. देवेंद्रानें केव्हांही तिच्याशीं लग्न केलें नसतें हें तिला पक्कें माहीत होतें, तरीही तिला आपल्या मनाची समजूत घालतां येत नव्हती. देवेंद्राचें प्रेम संपादन करावें म्हणून ती तळमळत होती.

तिच्या मनांतला मत्सर जागा झाला होता. त्या मत्सराचे दोन बिंदू होते. एक देवेंद्र आणि एक कुंद. कुंदेच्या रूपाला देवेंद्र भाळला होता. कुंद सती साध्वी होती हें हिरेला पक्कें माहीत होतें, तरीही तिच्याबद्दल हिरेच्या मनांत मत्सर जागा झाला होता.

कुंदेचा सत्यानाश कसा होईल याचीच संधी या मत्सराच्या पायीं हिरा पहात होती. देवेंद्राची आणि कुंदेची भेट होऊं नये म्हणून ती डोळ्यांत तेल घालून जपत होती आणि तेवढ्यासाठींच तिनें कुंदेची काळजी वहाण्याची नोकरी पत्करली होती.

कुंदेला हल्लीं सर्वप्रकारें त्रास होत होता तो हिरेकडून. हिरा पूर्वीप्रमाणें तिची काळजी घेत नव्हती, कीं एका बऱ्या बोलानें तिच्याशीं बोलतही नव्हती. दासी असून देखील ती पदोपदीं कुंदेचा अपमान होईल अशाच रीतीनें वागत होती. कुंदा फार सालस होती. हिरेच्या या वर्तनामुळें तिला अतिशय त्रास होत होता, तरीही तिनें तिला कधीं छेडलें नाही. ती आपला धनीणपणा विसरून गेली होती. मालकीण होती कुंद, पण मालकिणीचा अधिकार गाजवीत होती हिरा—मालकिणीची मालकीण होऊन बसली होती हिरा.

नगेंद्र घर टाकून गेल्यानंतर एके दिवशीं अंत:पुराच्या शेजारीं असलेल्या बगीच्यांतल्या लतामंडपांत हिरा एकटीच पडून राहिली होती. संध्याकाळ झाली होती. आकाशांत पूर्णचन्द्र उगवला होता. त्याचें चांदणें लतामंडपाच्या झरोक्यांतून आंत येत होतें. इतक्यांत हिरेला दिसून आलें—कुणातरी पुरुषाची छाया! तिनें उठून पाहिलें. तो देवेंद्र होता. तो आतां वेष बदलून आला नव्हता. हिरा चकित होऊन म्हणाली, " हें काय भलतंच धाडस! कुणी पाह्यलं तर तुमच्या जिवावर बेतेल. "

" जिथं हिरा आहे तिथं मी कुणालाच भिणार नाहीं. " असें म्हणून देवेंद्र तिच्या शेजारींच बसला.

हिराला हेंच हवें होतें. ती म्हणाली, " कशाला आलां आहां? जिला पहायला आलां आहां ती आतां दिसणं कठीण आहे. "

" तूं चुकलीस. " देवेंद्र म्हणाला, " मी जिला पहायला आलों होतों ती मला भेटली. मी तुझ्याचसाठीं आलों होतों. "

त्याच्या या लाघवी बोलण्याला हिरा भाळली नाहीं. ती हंसली आणि म्हणाली, " माझं नशिब कांहीं एवढं खुललेलं नाहीं. खरोखरच मला भेटायला आलां असाल तर इथं बसणं बरं नव्हे. दुसऱ्या कुठं तरी चला. इथं धोका आहे. मला वाटतं, आपण तुमच्या कुंजांत जाऊं. "

" माझी भीति वाटत नाहीं तुला ? " देवेंद्रानें विचारलें.

" मी तुम्हाला भीत नाहीं, " हिरा म्हणाली, " पण मी भीतें आहें कुणीतरी मला तुमच्या शेजारीं पाहील म्हणून. "

" तर मग चल. " देवेंद्र संकोचानें म्हणाला, "–तुझ्या नवीन मालकिणी-बरोबर एकदां बोलाचाली करायचं नाहीं का जमायचं ? "

तें ऐकून हिरेच्या अंगाचा भडका झाला. ती म्हणाली, " तिची भेट कशी होईल ? "

देवेंद्र म्हणाला, " तूं मनांत आणलंस तर सारं कांहीं होईल. "

" तर मग आपण इथं जरा सावधपणें बसा. तिला घेऊन येतां येतं कीं काय तें मी एकदां पहातें. " असें बोलून हिरा लतामंडपाच्या बाहेर आली.

एका झाडाच्या आड उभें राहून तिनें एकदां पोटभर आंसवें गाळून घेतलीं आणि नंतर ती वाड्यांत गेली. कुंदनंदिनीकडे न जातां ती सरळ दरवानापाशीं गेली आणि म्हणाली, " अरे चला लवकर ! फुलबागेत चोर आला आहे ! " तें ऐकतांच भल्या भक्कम कळकीच्या लाठ्या हातीं घेऊन दोबे, चौबे, पांडये आणि तिवारी बगीच्याकडे धांवले. त्यांच्या नागरा जुत्यांचा आवाज ऐकतांच देवेंद्र लतामंडपांतून एकच उडी मारून एकदम धांवत सुटला. तिवारी मंडळी त्याच्या मागें लागली, पण तो कांहीं त्यांना सांपडला नाहीं. त्यांच्या हातचें लाठीचें थोडेंसें बक्षीस मात्र देवेंद्राला मिळालें असावें.

घरीं जाऊन पोंचतांच देवेंद्रानें दोन प्रतिज्ञा केल्या—पहिली, हिरा असेपर्यंत दत्तांच्या वाड्यांत जायचें नाहीं. दुसरी, हिराला याचें योग्य बक्षिस द्यायचें.

● ●

## —: ३३ :—

● **पावसाळ्याचे** दिवस होते. सारा दिवस सारखा पाऊस लागत होता. उभ्या दिवसांत एकदांसुद्धां सूर्यकिरण दिसला नाहीं. आकाश ढगांनीं अगदीं व्यापून गेलें होतें. काशीला जायच्या पक्क्या रस्त्याच्या फरशीवर-देखील थोडा थोडा चिखल जमला होता. रस्त्यांत एकसुद्धां माणूस दिसत नव्हतें. एक ब्रह्मचारी काय तो चिखलांतून पाय ओढीत जात होता. अंगावर भगवी छाटी, गळ्यांत रूद्राक्ष, माथ्यावर तोकडे तोकडे केंस—मधून मधून पांढरे झालेले—आणि हातीं ताडाची छत्री घेऊन भिजत भिजत तो चालला होता. आधींच काळोखाचे दिवस, त्यांतून पाऊस पडत असलेला, सारी पृथ्वी काळ्या शाईंत बुडवल्यासारखी दिसत होती. त्या ब्रह्मचाऱ्याला रस्ता शोधून काढणें मोठें कठीण जात होतें. रात्र बरीच झाली होती. काळ्याकुट्ट आकाशांत मधून मधून वीज चमकत होती त्यामुळें त्या चमकत्या प्रकाशापेक्षां पुरा काळोखच बरा वाटत होता.

"आई ग !"

त्या ब्रह्मचाऱ्याच्या कानीं काळोख्यांतून हा सुस्कारलेला उद्गार ऐकूं आला. यावेळीं विजा सारख्या चमकत होत्या. त्यानें पाहिलें, रस्त्याच्या बाजूला कांहीं तरी पडलें होतें. मनुष्य का ? होय मनुष्यच ! त्यानें विचारलें, "कोण रस्त्यांत पडलंय तें ?"

कुणीच उत्तर दिलें नाहीं. पुन्हा त्यानें विचारलें त्यावेळीं माणसाचें अस्पष्ट विव्हळणें त्याच्या कानीं आलें. हातांतली छत्री आणि सामान-सुमान खालीं ठेवून त्या शब्दाच्या अनुरोधानें माग काढीत जात तो हातानें चांचपून पाहूं लागला. माणसाचा देह त्याच्या हाताला जाणवला. मस्तकाकडे हात गेला तेव्हां लांब केंस त्याच्या हाताला लागले. तो उद्गारला, "अरे देवा ! ही तर बाई !"

त्या मूर्छित असलेल्या बाईला उचलून घेऊन तो चालूं लागला. त्याची छत्री आणि सामान तिथेंच पडून राहिलें. काळोखांतून वाट काढीत तो गांवच्या रस्त्याला लागला होता.

गांवच्या एका बाजूला असलेल्या पर्णकुटीपाशीं तो आला. त्यानें हांक मारली, " आहे का ग कोण घरांत ? "

आंतून कुणीतरी बाई बोलली, " हा आवाज दिसतो आहे बुवाजींचा! केव्हां आलांत बुवाजी ? "

" हा आतांच आलों, " ब्रह्मचारी म्हणाला, " लवकर दार उघड. मोठ्या पेंचात सांपडलों आहें मी. "

हरमणीनें झोंपडीचें दार उघडलें. तिला दिवा पेटवायला सांगून ब्रह्मचाऱ्यानें त्या बाईला आंत नेऊन जमिनीवर ठेवलें. हरमणी दिवा घेऊन आली त्यावेळीं त्या दोघांनींही त्या बाईचा चेहरा नीट निरखून पाहिला. ती बाई तशी म्हातारी नसावी—पण प्रस्तुतच्या अवस्थेमुळें तिचें अचुक वय कुणाला सांगतां आलें नसतें. तिच्या अंगावरचें वस्त्र भिजलें होतें आणि तें ठिकठिकाणीं फाटलेलें होतें. तिच्या माथ्यावरचे भिजलेले केंस अगदींच रुक्ष होते. डोळे खोल गेलेले होते—बंद होते. ती श्वास सोडीत होती पण तिला शुद्ध नव्हती—बहुधा मृत्युकाल समीप आल्याचा भास होत होता.

" कुठं मिळाली ही तुम्हांला ? " हरमणीनें विचारलें तेव्हां ती सारी हकीकत तिला सांगून ब्रह्मचारी म्हणाला, " ही मरणाच्या पंथाला लागलेली देसतेय. शेकून भाजून पाहिलं तर कदाचित वांचेलही. आतां मी सांगतों तसं कर—"

ब्रह्मचाऱ्याच्या सांगण्याप्रमाणें हरमणीनें मोठ्या कौशल्यानें तिचें भिजलेलें वस्त्र बदलून कोरडें नेसवलें. नंतर शेगडी पेटवून त्यांनीं तिला शेक द्यायला सुरवात केली. ती बऱ्याच दिवसांची भुकेलेली असावी असें ब्रह्मचाऱ्याला वाटल्यामुळें त्यानें हरमणीला सांगून दूध तापवून घेऊन तिला पाजलें. गरम दूध पोटांत जातांच तिनें डोळे उघडले असें पाहून हरमणीनें विचारलें, " तुम्हीं कुठून आलां होतां बाई ? "

शुद्धीवर येतांच ती उद्‌गारली, " कुठं आहें मी ? "

ब्रह्मचारी म्हणाला, " रस्त्यांत तूं मूर्च्छित पडलेली पाहून मी तुला इथं घेऊन आलों. कुठं जायचं आहे तुला ? "

" खूप दूर जायचं आहे मला ! " ती बाई म्हणाली.

हरमणीनें विचारलें, " तुझ्या हातीं चुडा आहे—सवाष्ण आहेस ना तूं ? " तिनें मानेनें होकार दिला तेव्हां हरमणीनें विचारलें, " नांव काय तुझं ? "

ती क्षणभर कांचरली. नंतर म्हणाली, " माझं नांव सूर्यमुखी ! "

सूर्यमुखी वांचण्याची आशा दिसत नव्हती. ब्रह्मचाऱ्यानें गांवच्या वैद्याला बोलावून घेतलें. तिथले वैद्य रामकृष्ण राय मोठे प्रख्यात होते. त्यांनीं तिला तपासून पाहून घेतलें. ते म्हणाले, " हिला कफ झाला आहे, त्यांत तापही येतो आहे, एकंदरींत लक्षण ठीक नाहीं—योग्य उपचार झाल्यास जगेलही कदाचित. "

हें वैद्याचें निदान सूर्यमुखीच्या समोर झालें नव्हतें. वैद्य निघून गेल्यावर ब्रह्मचारी सूर्यमुखीजवळ येऊन बसला तेव्हां सूर्यमुखी म्हणाली, " माझ्यासाठीं एवढी उठाठेव कशाला करतां आहां ? कशाला एवढा त्रास करून घेतांहां ? "

" यांत त्रास कसला ? " ब्रह्मचारी म्हणाला, " हेंच काम आहे माझं. मला वाटतं, तूं कुणीतरी थोरामोठ्या घरची असावीस. कांहींतरी तसंच विशेष कारण झाल्यामुळ तूं इकडे आली असावीस—मला कां सांगत नाहींस ? "

सूर्यमुखी डोळ्यांत पाणी आणून म्हणाली, " मरणाच्या दाराशीं उभी असतांना आतां लाज कशाला धरूं ? तसं विशेष कांहीं नाहीं—मरायच्यापूर्वी एकदां माझ्या पतीला पाहिलं असतं—एवढीच इच्छा शेवटची. "

ब्रह्मचाऱ्यानेंही डोळे पुसले आणि विचारलें, " कुठं रहातो तुझा नवरा ? " सूर्यमुखीनें पत्ता सांगितला तेव्हां ब्रह्मचाऱ्यानें तिच्याच सम्मतीनें खालील पत्र लिहिलें:—

" माझा आपला परिचय नाहीं. मी एक ब्राह्मण आहें. ब्रह्मचर्याश्रमी आहें. मीही आपल्याला ओळखीत नाहीं. श्रीमती सूर्यमुखी आपली पत्नी आहे एवढेंच मी जाणतों. या मधुपूर गांवीं हरमणी वैष्णवीच्या घरीं ती आसन्नमरण स्थितींत आहे. आम्ही तिला औषधोपचार करीत आहों, पण ती जगण्याचें लक्षण दिसत नाहीं. शेवटीं एकदां तुमची भेट व्हावी अशी तिची इच्छा असल्यामुळें तिच्या सांगण्यावरूनच मी हें पत्र लिहीत आहें. आपली यायची इच्छा असेल तर राणीगंजच्या मार्गे यावें. तिथें

श्री माधवचन्द्र गोस्वामी आहेत. त्यांना आपण माझें नांव सांगितलें म्हणजे ते आपल्याबरोबर माणसें देतील आणि मग मधुपुरांत येऊन तपास करण्याचे आपले श्रम वांचतील. यायचें असेल तर लवकर या. उशीर लावल्यास भेटीचा संभव कमी. इति—

शिवप्रसाद शर्मा. ”

पत्र लिहून झाल्यावर ब्रह्मचाऱ्यानें सूर्यमुखीला पत्ता विचारला. नवऱ्याचें नांव कसें घ्यायचें ? हरमणी आल्यावर तिनें कसाबसा नांवपत्ता लिहून दिला आणि पत्र रवाना झालें.

ब्रह्मचारी निघून गेल्यावर सूर्यमुखी ईश्वराला उद्देशून म्हणाली, “ अरे देवा ! तूं जर खरोखरच कुठं असशील आणि माझी पतिभक्ति जर खरी असेल, तर माझ्या पत्राचा उपयोग होईल. मरण्यापूर्वीं एकदां माझ्या पतीची माझी भेट होऊं दे. ”

पण तें पत्र नगेन्द्राच्या हातीं पोंचलें नाहीं. त्यापूर्वींच तो गांव सोडून देशांतराला गेला होता. जातांना त्यानें दिवाणजीला आपलीं पत्रें आपण कळवलेल्या पत्त्यावर पाठवावीं असें सांगितलें होतें. दिवाणजीला यापूर्वीं पाटण्याहून पत्र आलें होतें, कीं आपण जलमार्गें काशीला जात आहें, तिथें पोंहचल्यावर पत्र येईल त्याप्रमाणें आपलीं पत्रें तिकडे पाठवावीं. दिवाणजी त्या पत्राची वाट पहात होते आणि म्हणूनच सूर्यमुखीचें पत्र तिथेंच पडून राहिलें होतें.

काशीला पोंचल्यावर नगेंद्राचें पत्र आलें, त्याप्रमाणें दिवाणजींनीं इतर पत्रां-बरोबर ब्रह्मचाऱ्याचें पत्रही त्याच्याकडे रवाना केलें. तें पत्र हातीं मिळतांच नगेंद्राला मोठा धक्का बसला. शक्य तेवढी जलदी करून राणीगंजला जायची त्यानें तयारी केली. ब्रह्मचाऱ्याचें पत्र बऱ्याच दिवसांनीं नगेंद्राच्या हातीं पोंचलें असल्यामुळें सूर्यमुखीची भेट होईल कीं काय याची त्याला खात्री वाटत नव्हती. तिच्या भेटीसाठीं त्याचा जीव डोळ्यांत आला होता.

यावेळीं सूर्यमुखी कुठें होती ?

● ●

## —: ३४ :—

● **दरवानाच्या** हातचा मार खाऊन देवेंद्र आपल्या घरीं गेला त्यावेळीं हिरा पोटभर हंसली होती, पण आतां तिला पश्चात्ताप झाला होता. ती देवेंद्राला भीत होती. तिला चांगली अद्दल घडावी म्हणून देवेंद्रही वाट पहात होता. मालतीला पाठवून त्यानें हिराला बोलावलें. एक दोन दिवस चुकवाचुकवी करीत शेवटीं ती देवेंद्रापाशीं आली. त्यानेंही आपल्याला राग आल्याचें तिला दाखवलें नाहीं, कीं त्या पूर्वीच्या घटनांचा उल्लेखही केला नाहीं. माशीला पकडण्यासाठीं कोळी शांतपणें जसें जाळें विणतो, त्याचप्रमाणें तो हिरेला पकडण्यासाठीं जाळें विणीत होता.

देवेंद्रानें हिरेशीं प्रेमाचें भाषण करायला सुरवात केली. हिरा चतुर होती खरी, पण मुळांतच तिचा देवेंद्राकडे ओढा असल्यामुळें त्याच्या या गोड गोड भुलथापांना ती बळी पडली. तंबोरा हातीं घेऊन तो प्रेमाचीं गाणीं आळवून आळवून म्हणूं लागला त्यावेळीं हिरेच्या डोळ्यांतून आनंदाश्रूंच्या धारा वाहूं लागल्या.

तंबोरा खालीं ठेवून त्यानें आपल्या वस्त्रानें हिरेचे डोळे पुसले. हिरा रोमांचित झाली. तो अनेक प्रकारें जेव्हां तिच्याशीं प्रेमालाप करूं लागला, लगट करूं लागला, त्यावेळीं हिरेला वाटलें, कीं स्वर्गसुख म्हणतात तें हेंच !

यापूर्वीं तिला इतक्या प्रेमानें कुणी वागवलें नव्हतें. देवेंद्रनें तिला एक प्रेमगीत गायला सांगितलें. फारा दिवसांनीं तिनें गाण्यासाठीं तोंड उघडलें होतें. हिरा गाऊं लागली—तें प्रेमगीत होतें—दूर झालेल्या वल्लभाला आळवणी करणारें तें गीत गातांना हिरा देहभान विसरली होती.

आजवर हिरेनें आपलें मन ताब्यांत ठेवलें होतें, वेळोवेळीं संयम केला होता, पण यावेळीं तिचा तोल सुटला. देवेंद्र आपली उपेक्षा करतो असा समज असल्यामुळेंच आजवर तिला मन ताब्यांत ठेवणें शक्य झालें होतें—पण या प्रसंगीं मात्र तिचा मनावरचा ताबा सुटला.

पतंगासारखी तिनें दिव्यावर झेंप घातली. देवेंद्राच्या प्रेमाची साक्ष पटल्यामुळें आतां मनाचा संयम करणें तिला अशक्य झालें आणि याचपायीं तिला विषवृक्षाचें फळ चाखावें लागलें.

● ●

## —: ३५ :—

• **पावसाळा** संपला. शरदृऋतु आला. शरद्‌कालही गेला. शेतांतलीं धान्यें पिकलीं. तळ्यांतली कमळें आतां फुलत नव्हतीं. पहांटेच्या वेळीं झाडांच्या पानांतून दंवाचे थेंब खालीं ठिबकूं लागले होते. संध्याकाळीं चोंहींकडे धुकें पसरत होतें. अशावेळीं मधुपूरच्या रस्त्यावर एके दिवशीं एक मेणा आला. खेडेगावांत हें वाहन क्वचितच येत असे. तें आलेलें पहातांच गांवचीं पोरेंबाळें मेण्याभोंवतीं गोळा झालीं. पाणवठ्यावर जाणाऱ्या बायका तिथेंच थांबून माथ्यावरचा पदर जरा मागें सारून मेण्याकडे पाहूं लागल्या. शेतकरी लोक मळणीचें काम तहकूब ठेवून आ वासून पाहूं लागले. सारेच थक्क झाले होते. मेण्याच्या बाहेर दिसणारा पाय बूटवाला असल्यामुळेंच सर्वांची ही धांदल उडाली होती. सर्वांना वाटत होतें कुणीतरी साहेब आहे.

मेण्यांतून नगेंद्र बाहेर पडला त्यावेळीं गांवच्या चारपांच माणसांनीं समोर येऊन त्याला सलाम केला. त्याचा पोषाख साहेबी थाटाचा असल्याचाच हा परिणाम होता. नगेंद्राला वाटलें, गांवचा कुणीतरी प्रतिष्ठित मनुष्य भेटल्याशिवाय आपला कार्यभाग होणार नाहीं.

मोठ्या कष्टानें त्यानें गांवचे वैद्य रामकृष्ण राय यांचा पत्ता लावला. वैद्यराजांच्या घरीं नगेंद्राचें स्वागत झालें. रामकृष्ण राय म्हणाले, कीं ब्रम्हचारी गांव सोडून गेला होता. नगेंद्राची निराशा झाली. ब्रह्मचाऱ्याचा पत्ताही कुणाला माहीत नव्हता, तसेंच तो केव्हां परत येणार हेंही त्यानें कुणाला सांगितलें नव्हतें. गेल्या श्रावणांत तो मधुपुरांत आला होता आणि भाद्रपदांत निघून गेला होता.

ब्रह्मचाऱ्याचा पत्ता लागत नाहीं असें पाहून नगेंद्रानें हरमणी वैष्णवीचा पत्ता विचारला. तेव्हां वैद्यराज म्हणाले, " हरमणीचं घर रस्त्याच्या कडेलाच होतं, पण आतां तिथं कांहीं नाहीं. तें घर जळून खाक झालं. "

नगेंद्रानें कपाळावर हात मारून घेतला. त्यानें विचालें, " हरमणी कुठं आहे ? "

"तें कांहीं सांगतां येत नाहीं," वैद्यराज म्हणाले, "ज्या रात्रीं तिच्या घराला आग लागली तेव्हांपासून ती कुठं नापत्ता झाली आहे. तिनंच आपल्या घराला आग लावली असंही कुणी कुणी म्हणतात."

"तिच्या घरीं कुणी दुसरी बाई होती का?" नगेंद्रानें डोळयांत प्राण आणून विचारलें.

वैद्यराज म्हणाले, "गेल्या श्रावणांत एक बाहेरगांवची बाई आजारी पडून तिच्या घरीं येऊन राहिली होती. तिला ब्राह्मणानंच तिथं आणून ठेवलं होतं. तिचं नांव होतं सूर्यमूखी. तिला कफक्षय झाला होता. मीच तिला औषध देत होतों. ती जवळ जवळ बरी होत आली होती—इतक्यांत—"

नगेंद्रानें धापा टाकीत विचारलें, "इतक्यांत काय झालं?"

वैद्यराज म्हणाले, "हरवैष्णवीच्या घराला आग लागली त्यांत ती बाई जळून मेली."

तें ऐकतांच नगेंद्रनाथला जबरदस्त धक्का बसला. तो मूर्च्छित होऊन बैठकीवरून खालीं पडला. वैद्यराज त्याला शुद्धिवर आणण्यासाठीं उपचार करूं लागले.

हा संसार आहे विषमय! सर्वांच्याच घराच्या अंगणांत विषवृक्ष उभा असतो. वांचायला हवें आहे कुणाला? अन् प्रेम तरी करायला तयार होतें आहे कोण?

इतक्या दिवसांनीं सारें कांहीं संपलें. संध्याकाळीं नगेंद्र दत्त ज्यावेळीं मेण्यांत बसून मधुपूरहून निघाला त्यावेळीं त्याला वाटलें, कीं आपलें सर्वस्व संपलें. कां संपलें? सुख काय? घर सोडलें त्याच दिवशीं तें संपलें होतें. मग संपलें काय? आशा? जोंपर्यंत आशा असते तोंपर्यंत माणसाला कसली उणीव तेवढीशी भासत नाहीं. आशा संपली कीं सारें कांहीं संपलें. म्हणूनच तो आज गोविंदपूरला जायला निघाला होता. तो आपल्या गांवीं जाऊन आपल्या घरांत स्वस्थपणें रहायला जात नव्हता,—गृहस्थधर्माचा शेवटचा निरोप घेण्यासाठीं तो जात होता.

तें फार मोठें काम होतें. अफाट संपत्ती, जमीदारी, सहा चौक असलेला मोठा वाडा, वडिलार्जित आणि स्वतः मिळवलेली स्थावर संपत्ती, बहिणीचा मुलगा सतीशचंद्र याच्या नांवें करून द्यायचें त्यानें ठरवलें होतें. बंगम

मालमत्ता तो कमलमणीला बक्षिसपत्र करून देणार होता. ही सगळी निरवानिरव करून, आपली वास्तू सोडून तो पुन्हां देशपर्यटणाला निघणार होता.

मेण्यांत बसल्यावेळीं त्याचे हेच विचार चालले होते. चटकन् त्याला आठवण झाली—आपण आरामांत मेण्यांतून जात आहोंत पण सूर्यमुखी पायाखालीं रस्ता तुडवीत गेली होती. तें मनांत येतांच तो मेण्यांतून खालीं उतरला. त्यानें भोयांना रजा दिली आणि यापुढें पायींच प्रवास करायचें त्यानें ठरवलें. सूर्यमुखीच्या हत्येचें एवढें तरी प्रायश्चित्त करावें—

कसलें प्रायश्चित्त ? घर टाकून गेलेल्या सूर्यमुखीला जे जे क्लेश भोगावे लागले ते ते आपण अनुभवून पहायचे असा त्यानें निश्चय केला. गोविंदपूरहून निघाल्याबरोबर प्रवास पायीं, भोजन कदन्न, शयन झाडाखालीं किंवा कुठल्यातरी झोंपडींत करायचें असा त्यानें निश्चय केला.

● ●

## —: ३६ :—

● **प्रहररात्र** उलटून गेली होती. श्रीशचंद्र एकटाच बैठकखान्यांत बसला होता, इतक्यांत हातांत कॅनव्हासची बॅग घेऊन नगेंद्र तिथें आला. बॅग बाजूला ठेवून तो एका खुर्चीवर बसला. त्याची थकलेली मुद्रा, उतरलेला चेहरा पाहून श्रीशचंद्र घाबरून गेला. काय विचारावें हेंच त्याला सुचेना. ब्रह्मचाऱ्याचें पत्र आल्यामुळें नगेंद्र मधुपूरला जाणार होता एवढेंच त्याला कळलें होतें. नगेंद्र गुपचुप बसलेला पाहून श्रीशचंद्र म्हणाला, "असा कां झाला आहेस ? मधुपूरला गेला नाहींस का तूं ? ब्रह्मचारी भेटला नाहीं का ?"

"नाहीं." नगेंद्र म्हणाला.

"सूर्यमुखीचा कांहीं पत्ता लागला का ?" श्रीशनें विचारलें, "कुठं आहे ती ?"

वर बोट करून नगेंद्र म्हणाला, "स्वर्गांत !"

श्रीशचंद्र उगीच राहिला. हा प्रसंग समाधानाचे चार शब्द बोलण्याचा नव्हता. त्याच्या झोंपण्याची तयारी करण्यासाठीं श्रीश उठला तेव्हां नगेंद्र

म्हणाला, " तूं बैस, पुष्कळच बोलायचं आहे तुझ्यापाशीं, तेवढ्याचसाठीं आलों आहें मी. "

तितक्यांत कमल आली—तिलाही कळलें कीं सूर्यमुखी नाहीं. ती धरणीवर अंग टाकून रडूं लागली.

वैद्यराज रामकृष्ण राय यांजकडून कळलेली सारी हकिकत नगेंद्रनें त्यांना सांगितली त्यावेळीं श्रीशचंद्र म्हणाला, " वाटेंत तुला ब्रह्मचारी भेटला नाहीं का ? तुला भेटण्यासाठीं तो कालच मधुपूरला गेला आहे. "

नगेंद्रनें विचारलें, " ब्रह्मचाऱ्याचा पत्ता तुला कसा लागला ? "

श्रीशचंद्र म्हणाला, " फार मोठा माणूस आहे तो ! तुझ्या पत्राचं उत्तर न आल्यामुळं तुला भेटण्यासाठीं तो स्वतः गोविंदपूरला गेला होता. गोविंदपूरला तूं भेटला नाहींस, तुम्ही पत्नं काशीला जाताहेत असं कळलं, तेव्हां तो पुरुषोत्तम क्षेत्राची यात्रा करून पुन्हां गोविंदपूरला आला. त्यावेळींही तुझी भेट झाली नाहीं. माझ्याकडे तुझा पत्ता लागेल असं कुणीतरी सांगितल्यामुळं तो मला भेटायला इथं आला. मी त्याला तुझं पत्र दाखवलं, तेव्हां तो तुला भेटण्यासाठीं मधुपूरला जायला निघाला. काल रात्रीं राणीगंजला तुझी त्याची भेट व्हायला हवी होती. "

" मी काल राणीगंजला नव्हतों. " नगेन्द्र म्हणाला, " सूर्यमुखीबद्दल त्यानं तुला कांहीं सांगितलं का ? "

" तें मी उद्यां सांगेन. " श्रीश म्हणाला.

नगेन्द्र म्हणाला, " त्या गोष्टी ऐकून मला क्लेश होतील असं तुला वाटत असेल—आतां त्याचं काय ? यापेक्षां अधिक क्लेश ते काय होणार आहेत ? काय तें आतांच सांग मला. "

श्रीशचन्द्रानें ब्रह्मचाऱ्याकडून ऐकलेली सर्व हकिकत त्याला सांगितली. त्यावेळीं नगेन्द्र म्हणाला, " ती कुठं गेली होती, तिनं काय केलं, तें त्या ब्रह्मचाऱ्यानं सांगितलं का तुला ? "

श्रीशचन्द्र म्हणाला, " गोविंदपूरहून सूर्यमुखी चालत चालत हळुहळु इकडेच येत होती. रोज कोस दीड कोस मजल मारीत होती. "—

" तिनं घरांतून एक पैसाही घेतला नव्हता—मग कसं चाललं तिचं ? "

" केव्हां केव्हां उपास—तर केव्हां केव्हां भिक्षा. " असें श्रीशचन्द्र म्हणाला पण तें नगेन्द्रच्या कानीं पडतें न पडतें तोंच तो मूर्च्छित होऊन पडला. श्रीशचन्द्रानें अनेक प्रयत्न करून त्याला सावध केलें. शुद्धीवर येतांच तो म्हणाला, " पुढं बोल. "

श्रीशचन्द्र घाबरला. तो म्हणाला, " पुढं काय बोलूं ? "

" काय झालं असेल तें बोल. " नगेन्द्र म्हणाला, " नाहींतर मी इथं तुझ्यासमोर जीव देईन. "

श्रीशचन्द्र भीतभीत बोलूं लागला, "—त्यानंतर सूर्यमुखीला फारसे कष्ट सहन करावे लागले नाहींत. एक धनाढ्य ब्राह्मण सहपरिवार काशीला जात होता. कलकत्त्यापर्यंत तो होडींतून आला होता. नदीच्या कांठीं एका झाडाच्या सावलींत सूर्यमुखी झोंपलेली त्याला दिसली. सूर्यमुखीची दया येऊन त्याच्या पत्नीनं तिला आपल्याबरोबर होडींत घेतलें. आपणही काशीला येईन असं सूर्यमुखी त्यांना म्हणाली होती. त्यानंतर ती बरहीपर्यंत त्यांच्या-बरोबर गेली. कलकत्त्यापर्यंत होडीनं, कलकत्त्यापासून राणीगंजपर्यंत आगगाडीनं आणि राणिगंजहून बुलक्ट्रेननं गेली होती. इथपर्यंत तिला प्रवासांत त्रास झाला नव्हता. "

" त्यानंतर त्या बाम्हणानं निरोप दिला का तिला ? " नगेन्द्रानें विचारलें.

" नाहीं. " श्रीश म्हणाला, " सूर्यमुखीनं स्वतःच त्याचा निरोप घेतला. ती काशीला गेली नाहीं. तुझ्याशिवाय तिच्यानें रहावेना. तुला भेटण्यासाठीं ती बरहीपासून पायीं पायींच निघाली. "

ही हकिकत सांगत असतांना श्रीशचंद्राच्या डोळ्यांवाटे पाणी आलें. त्यानें नगेन्द्राकडे पाहिलें. श्रीशचन्द्राच्या डोळ्यांत पाणी आलेलें पाहून नगेंद्र गहिंवरला आणि त्याच्या गळ्याभोंवतीं हात टाकून रडूं लागला.

श्रीशचन्द्राच्या घरीं येईपर्यंत नगेन्द्र रडला नव्हता. त्याच्या शोकाची मजल रडण्यापलीकडे गेली होती. आतां तो आवरलेला शोकाचा प्रवाह दुथडी भरून वाहूं लागला, त्यामुळें त्याच्या मनांतल्या यातना बऱ्याच ओसरल्या.

नगेन्द्र थोडासा शांत झाला असें पाहून श्रीशचन्द्र म्हणाला, "आतां ह्या गोष्टीच नकोत!"

नगेन्द्र म्हणाला, "आतां बोलण्याजोगं असं आहे तरी काय? बरहीपासून ती एकटीच पायीं पायीं मधुपूरला आली. उपासपोटीं, उन्हातान्हांत, पाऊस-वावझडींत निराधार फिरत असतांना सूर्यमुखी आजारी पडली आणि मरणाच्या पंथाला लागली—हेंच ना?"

श्रीशचन्द्र यावर कांहीं बोलला नाहीं.

थोड्या वेळानें तो म्हणाला, "आतां कशाला उगीच त्या गोष्टी आठवतोस? तुझा कांहींच अपराध नव्हता. तिची संमति न घेतां किंवा तिनं नको म्हणत असतां हट्टानं तूं कांहींच केलं नव्हतंस. स्वतःच्या दोषानं जें घडलं नाहीं त्याच्यासाठीं बुद्धिमान व्यक्तीनं पश्चात्ताप करूं नये."

नगेन्द्रला त्याचें म्हणणें पटलें नाहीं. त्याला वाटत होतें, सर्व दोष आपलाच.



## —: ३७ :—

● ज्या दिवशीं देवेंद्राला दरवानाकडून मार देऊन बागेतून घालवून दिलें होतें त्या दिवशीं हिराला मोठा आनंद झाला होता, पण हा तिचा आनंद फार वेळ टिकला नाहीं. देवेंद्राला आपल्या पकडींत धरण्याची इच्छा तिला टाकून देतां आली नाहीं. ती गोष्ट सुसाध्य नव्हती हें तिला माहीत होतें—आतां देवेंद्राला अपमान करून घालवून दिल्यामुळें ती आशा पूर्वीपेक्षांही जास्त दुःसाध्य झाली आहे असें तिला वाटत होतें—स्वतःच्या या अविचाराबद्दल तिला पराकाष्ठेचा पश्चात्ताप होत होता.

इकडे देवेंद्रही हिरेवर फार चिडला होता. तिला चांगली अद्दल घडवायची संधी तो शोधत होता. हिरेला आपल्या बागेतल्या घरांत आणण्यासाठीं त्यानें मालतीची योजना केली. देवेंद्र मोठा धूर्त माणूस होता. हिरावर आपला राग आहे याचा पत्ता त्यानें तिला लागूं दिला नाहीं.

तरीही हिरा गेली नाहीं. मालती पुन्हा आली. ती पुन्हा पुन्हा येत होती आणि हिरा टाळाटाळ करीत होती, पण देवेंद्राची ही अत्याग्रहाची विनवणी तिला धिक्कारतां आली नाहीं.

हिरा त्याच्या घरीं गेली. देवेंद्र मनांतल्या मनांत हंसत होता. हिरा येतांच त्यानें आपल्या मनांतला राग तिला दिसूं न देतां गोड गोड बोलायला सुरवात केली. हिराला वाटलें, कीं देवेंद्र पूर्वीचा अपमान विसरून गेला. हिरेचा गैर-समज झाला होता. तो दूर व्हायला फार अवधी लागला नाहीं. कांहीं दिवस त्यानें हिरेला खूप झुलवलें आणि शेवटीं एके दिवशीं लाथ मारून तिला घालवून दिलें.

हिरा आपल्या घरीं गेली नाहीं. गोविंदपुरांत एक मांग लोकांना औषधें देत असे. खरें पाहिलें तर त्याला औषधांची कांहींच माहिती नव्हती. तो नुसता विषवडीचा व्यापार करीत असे. हिरा त्या रात्रीं त्याच्या घरीं गेली आणि त्याला म्हणाली, "एक कोल्हा रोज आम्ही घरीं नसलों कीं घरीं येतो अन् हंडींतला भात खाऊन जातो. हंडींतल्या भातांत विष कालवून ठेवलं अन् त्यानं तो भात खाल्ला कीं तो मरून जाईल अन् माझ्यामागची ब्याद मिटेल. चटकन् प्राण जाईल असं विष मला दे."

त्या मांगाला कोल्ह्याची गोष्ट खरी वाटली नव्हती. तो म्हणाला, "तुला हवी असलेली वस्तु माझ्याकडे आहे, पण मी ती विकीत नसतों. मी विषाच्या वड्या विकतों असं कळलं तर पोलीस मला धरून नेतील."

हिरा म्हणाली, "तुला त्याची काळजी नको. मी गंगाजल उचलून शपथ करतें, कीं तूं हें विष मला दिलंस असं मी कुणालाही सांगणार नाहीं. दोन कोल्हे मरतील एवढं विष मला दे. मी तुला पन्नास रुपये देईन."

त्या मांगाला निश्चितपणें वाटलें, कीं ही बया कुणाचा तरी जीव घेणार आहे खास. तरीपण पन्नास रुपयांचा लोभ त्याला आवरतां आला नाहीं. एकदम माणसाचा जीव जाईल असें विष त्यानें कागदाच्या पुडींत घालून हिरेच्या हातीं दिलें तेव्हां हिरा म्हणाली, "हें पहा, हें कुणा-पाशीं उघड करूं नकोस. ही गोष्ट बाहेर फुटली तर माझ्याबरोबर तुझ्याही गळ्याला फांस लागेल."

मांग म्हणाला, " बाई, मी तुझी ओळखसुद्धां दाखवायचा नाहीं. "

हिरा निःशंक होऊन घरीं आली. आपल्या खोलींत गेल्यावर विषाची पुडी हातीं घेऊन ती खूप रडली. थोड्या वेळानें तिनें डोळे पुसले. ती आपल्याशींच म्हणाली, " असं काय केलं आहे मी, कीं हें विष खाऊन मी जीव द्यावा ? ज्यानं मला मारलं त्याला उलट मार न देतां मी स्वतः मरूं काय म्हणून ? हें विष मी खाणार नाहीं. हें विष एक त्याला तरी खायला लावीन, किंवा कुंदनंदिनीला तरी चारीन. या दोघांतल्या एकाला मारल्यावर देखील जर तशीच वेळ आली, तर मीही जीव देईन. "

● ●

## —: ३८ :—

● **गोविंदपूरच्या** दत्तांचा वाडा भारीच मोठा होता. सहा चौकांचा वाडा, पण नगेंद्र आणि सूर्यमुखी तिथें नसल्यामुळें त्या वाड्यांत शुकशुकाट झाला होता. जिकडे तिकडे अवकळा आली होती. लक्ष्मी होती खरी, पण गृहलक्ष्मी तिथें नव्हती ! लक्ष्मीशिवाय वैकुंठ कसलें ?

घरांतील नोकरचाकर कुंदनंदिनीला ' मालकीण ' म्हणून म्हणूं लागले कीं तिला वाटे, ते आपली थट्टा करताहेत. घरच्या व्यवस्थेसाठीं दिवाणजी तिला विचारायला माणूस पाठवीत तेव्हां तिच्या छातींत धडकी भरे.

कुंदेनें दिवाणजीची भीती घेतली होती त्याचें एक कारण होतें. नगेंद्र कुंदेला पत्र लिहित नसे. दिवाणजीला तो जीं पत्रें लिहित असे तीं मागून घेऊन ती चोरून वाची. परत देत नसे. तीं पत्रें म्हणजे तिची भगवद्‌गीता होऊन बसलीं होतीं. दिवाणजी तीं पत्रें पुन्हा मागतील या भीतीनें दिवाणजीचें नांव निघालें कीं तिची मुद्रा खाड्कन उतरे. तीं पत्रें ती परत करीत नाहीं हें माहीत झाल्यामुळें ते त्या पत्रांच्या नकला ठेवून मग तीं कुंदेला देत असत.

वास्तविक सूर्यमुखीनें यातना सहन केल्या होत्या—कुंदेला काय यातना होत नव्हत्या ? सूर्यमुखीचें आपल्या पतीवर प्रेम होतें—कुंदेचें नव्हतें का ?

त्या तिच्या छोट्याशा हृदयांत अपरिमित प्रेमाचा सांठा सांठवलेला होता. अगदीं पहिल्या भेटीपासून, लग्न व्हायच्यापूर्वीदेखील, कुंदेनें नगेन्द्रावर प्रेम केलें होतें. तें तिनें कधीं व्यक्त केलें नाहीं, कीं कुणाला कळूंही दिलें नाहीं. नगेंद्राचा लाभ होईल असें तिला केव्हां वाटलेंच नव्हतें—तिनें तशी आशाही धरली नव्हती—ती आपली निराशा ती आपणच सहन करीत होती.

अशा वेळीं आकाशींचा चन्द्र तिच्या हातीं आला. आणि मग काय झालें ? आतां कुठें होता तो चन्द्र ? असा काय अपराध घडला म्हणून नगेंद्रानें तिला लाथ मारली ? रात्रंदिवस ती हाच विचार करीत करीत रडत होती.

नसेना कां नगेन्द्राचें प्रेम--पण एक क्षणभर त्याची दृष्टभेटसुद्धां होऊं नये ? कोणत्या कुक्षणीं नगेंद्रानें कुंदेशीं लग्न केलें ? पुन्हा कुंदेला वाटे, " सूर्यमुखीची अशी दशा झाली ती माझ्यापायीं. सूर्यमुखीनं मला जगवलं, वाढवलं, बहिणीसारखं प्रेम केलं—ती सूर्यमुखी रस्त्यावरची भिकारीण व्हायला मी कारणीभूत झालें. कोण आहे माझ्यासारखी दुर्भागी ? या पूर्वींच मी कां नाहीं मेलें ? " केव्हां केव्हां तिला वाटे, " मेलं पाहिजेच—पण एव्हां नाहीं—ती येऊं दे—तिला एकदां डोळे भरून पाहूं दे !—आतां ती यायचीच नाहीं का ? "

सूर्यमुखीच्या मृत्यूची बातमी कुंदेला कळली नव्हती, म्हणूनच ती म्हणे, 'सध्यां मला जीव धरून ठेवला पाहिजे. सूर्यमुखी आली कीं मग मी आनंदानं जीव देईन. तिच्या सुखाच्या वाटेंत कांटा होऊन रहाणार नाहीं.'

● ●

## —: ३९ :—

● **कलकत्त्याचीं** जरूर तीं कामें नगेन्द्रानें उरकलीं होतीं. दानपत्र लिहून झालें होतें. तें हरीपूरला रजिस्टर करायचें असल्यामुळें तें घेऊन नगेन्द्र गोविंदपूरला गेला. आपल्या मागोमाग येण्याविषयीं श्रीशचन्द्राला त्यानें सूचना दिली होती.

असें दानपत्र करूं नकोस, पायीं चालत जाऊं नकोस, असें श्रीशचन्द्रानें

त्याला विनवून विनवून सांगितलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तो त्याच्या मागोमाग होडीनें जायला निघाला होता. सतीशला बरोबर घेऊन कमलमणीही त्याच्याबरोबर निघाली होती.

सूर्यमुखी घर टाकून गेल्यापासून कमलमणीनें कुंदनंदिनीचा तिटकारा घेतला होता. ती तिचें तोंड देखील पहात नसे, पण आतां ती आली त्यावेळीं कुंदनंदिनीची झालेली दशा पाहून तिचा राग नाहींसा झाला—उलट तिची दया आली. कुंदनंदिनीला उत्साहित करण्यासाठीं ती आपल्यापरीनें प्रयत्न करीत होती. नगेन्द्र येत आहे असें तिनें सांगतांच कुंदच्या चेहऱ्यावर हसूं उगवलें. सूर्यमुखीच्या मृत्यूची बातमी बोलतां बोलतां सहजच निघाली तेव्हां कुंद धाय मोकलून रडूं लागली.

कमलमणीनें कुंदची समजूत घातली. ती सुद्धां आधीं तिच्याबरोबर रडली होती, पण आतां रडून काय होणार होतें ? कितीही रडलें तरी सूर्यमुखी आतां परत येणार नव्हती.

शेवटीं नगेन्द्र येऊन पोंचला. त्यावेळीं संध्याकाळ झाली होती. पहिल्यानेंच पूर आला म्हणजे नदी ज्याप्रमाणें धो धो वहाते पण भरतीं पुरी झाली म्हणजे जशी स्थिर आणि शांत होते, तसाच नगेन्द्राचा शोकप्रवाह आतां गंभीर स्वरूप धारण करता झाला होता.—अंतरांत दुःख जागें होतें तें ओसरलें नव्हतें—त्याचा धीरही खचला नव्हता—त्यामुळें त्याचें दुःख बाहेर दिसून येत नव्हतें. गांवच्या लोकांशीं तो खुल्या दिलानें बोलत होता. प्रत्येकाला बोलावून घेऊन तो त्याची खबर घेत होता. सूर्यमुखीचा उल्लेख करायचें तो कटाक्षानें टाळीत होता. त्याची ही धीर गंभीर वृत्ती पाहून सारे लोक त्याच्या दुःखानें दुःखी होत होते. पुराणे नोकर चाकर येऊन त्याला मुकाट्यानें प्रणाम करीत आणि आड जाऊन रडत असत. केवळ एकाच जीवाला त्यानें क्लेश दिले—जन्मापासून दुःखी असलेल्या कुंदनंदिनीची त्यानें भेट सुद्धां घेतली नाहीं.

नगेन्द्राच्या हुकुमाप्रमाणें दासींनीं सूर्यमुखीच्या शेजघरांतच त्याचा बिछाना घातला. रात्रीं सर्वजण झोंपीं गेले तेव्हां नगेन्द्र सूर्यमुखीच्या शेजघरांत आला—आल्याबरोबर त्याला रडूं कोसळलें.

नगेन्द्र त्या शेजघरांत एकटाच आला त्यावेळीं दोन प्रहर रात्र झाली होती. ती रात्र भयाण होती. संध्याकाळपासून पावसाच्या थोडथोड्या सरी येत होत्या. वावटळ उठली होती. यावेळीं हलुहलु पावसाचा जोर वाढत होता. प्रचंड वादळ उठलें होतें. घराचीं मोकळीं असलेलीं दारें धडाधड वाजत होतीं. जिकडे तिकडे पावसाचा प्रचंड मारा होत होता.

खोलींत येतांच नगेंद्रानें दार बंद करून घेतलें त्यावेळीं बाहेरच्या वादळाचा आवाज कमी झाला. खाटेच्या मागल्या बाजूचें दार खुलें ठेवलें गेलें होतें. शेजघरांत येतांच नगेंद्रानें एक मोठा सुस्कारा सोडला आणि एका कोचावर आंग टाकलें. तो सारखा रडत होता. तो त्यावेळीं किती रडला तें कुणालाच कळलें नाहीं.

खोलींतला दिवा हलुहलु बारिक होत होता. त्यानें पाहिलें, दिवा मालवायला आला होता. एक सुस्कारा सोडून तो बिछान्यावर आडवा झाला. बिछान्याला त्याचें आंग लागतें न लागतें तोंच बाहेरच्या वादळाचा जोर भयंकर वाढला. जिकडे तिकडे धडाधड आवाज होऊं लागले आणि त्याचवेळीं तेल संपल्यामुळें दिवा मालवला गेला. वातीचा काजवा तेवढा मिणमिणत होता.

त्या मिट्ट काळोखांत त्याला एक अद्भुत दृश्य दिसून आलें. बाहेरच्या वादळाच्या आवाजानें दचकून त्यानें खाटेजवळच्या मोकळ्या दाराकडे पाहिलें. त्या उघड्या दरवाजांत अंधुक प्रकाशांत त्याला एक छाया दिसली. ती छाया स्त्रीची होती!--तो अधिकच थक्क झाला. त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला. त्याचे हातपाय कापूं लागले.

ती स्त्री सूर्यमुखीसारखी दिसत होती.

ती ओळख पटतांच खाटेवरून उडी मारून तो त्या छायेकडे धांवला. छाया अदृश्य झाली आणि त्याचवेळीं वातीचा काजवाही साफ मालवला. एक दाबलेली किंकाळी फोडून नगेंद्र मूर्च्छित पडला.

नगेंद्र ज्यावेळीं शुद्धीवर आला त्यावेळीं उजाडलें होतें. खोलींत सूर्याचीं किरणें आलीं होतीं. घरामागच्या बगीच्यांतला झाडाझाडावर पक्षी किलबिल करीत होते.

खोलींत आलेल्या सूर्याच्या किरणांत त्यानें पाहिलें—त्याचें मस्तक कुणाच्या तरी मांडीवर होतें. त्यानें डोळे उघडले नाहींत. तशाच मिटल्या डोळ्यांनीं तो म्हणाला, " तूं केव्हां आलीस कुंद ? आज सारी रात्र मला स्वप्नांत सूर्यमुखी दिसत होती. स्वप्नांत मी तिच्या मांडीवर डोकं ठेवून पडलों होतों. तूं सूर्यमुखी असतीस तर-तूं सूर्यमुखी असतीस तर केवढा आनंद झाला असता मला ! "

ती म्हणाली, " त्या काळतोंडीला बघितलं तर तुम्हाला जर खरोखरच आनंद होत असेल तर मीच आहें कीं ती काळतोंडी ! "

नगेंद्रनें डोळे उघडून पाहिलें. तो दचकला. एकदम उठून बसला. त्यानें डोळे चोळले. पुन्हां एकदां नीट निरखून पाहिलें आणि दोन्ही हातांत मस्तक धरून तो बसून राहिला.

पुन्हा डोळे चोळून तो पाहूं लागला—खालीं मान घालून आपल्याशींच बोलूं लागला—" मी पागल झालों का ? कीं सूर्यमुखी जिवंत आहे अजून ? शेवटीं हेंच होतं का माझ्या कपाळीं ? अरेरे ! मी पागल झालों ! " असें म्हणून त्यानें जमिनीवर अंग टाकलें. हाताच्या स्वस्तिकांत तोंड लपवून तो ओक्साबोक्शी रडूं लागला.

आतां त्या स्त्रीनें उठून त्याचे पाय धरले. त्याच्या दोन्ही पायांत तोंड खुपसून तिनें आपल्या आसवांनीं त्याचीं पावलें भिजवून टाकलीं. ती म्हणाली, " उठा उठा, माझे जीवनाधार, जीवनसर्वस्व, उठून बसा ना ! एवढं दुःख सहन केलं त्याचं आज सार्थक झालं. ते सारे क्लेश आज संपले. उठा ! उठा ! मी मेलें नव्हतें. तुमच्या चरणांची सेवा करण्यासाठीं मी पुन्हां आलें आहें. "

आतां भ्रम कसला ? नगेंद्रानें सूर्यमुखीला धरून हृदयाशीं कवटाळलें आणि तिच्या खांद्यावर मस्तक ठेवून त्यानें रडायला सुरवात केली.

एकमेक एकमेकांच्या खांद्यावर मस्तक ठेवून रडत होतीं. कुणीसुद्धां बोलत नव्हतें—कित्ती कित्ती रडले ते !

किती आनंद आहे रडण्यांत !

## —: ४० :—

**सूर्यमुखीनें** मधल्या काळांत झालेली हकीकत नगेंद्राला सांगितली. ती म्हणाली, " मी मेलें नव्हतें. वैद्यराजांना मी जिवंत असल्याचं माहीत नव्हतं. त्यांच्या उपचारानं मी बरी होऊन हिंडती फिरती झालें तेव्हां गोविंदपूरला जाऊन तुम्हांला भेटण्यासाठीं उतावीळ झालें होतें. मी ब्रह्मचाऱ्याचा पाठपुरावा केला. मला घेऊन जायचं त्यानं कबूल केलं आणि त्याप्रमाणें आम्हीं निघालों. इथं आलों तेव्हां कळलं, कीं तुम्ही इथं नाहीं. इथून तीन कोसांवर असलेल्या एका ब्राम्हणाच्या घरीं माझी राहाण्याची व्यवस्था करून ब्रह्मचारी तुमच्या तपासासाठीं निघाला. पहिल्यानं कलकत्त्याला जाऊन त्यानं श्रीशचंद्राची भेट घेतली. तिथं कळलं, कीं तुम्ही मधुपूरला गेलां. ब्रह्मचारी मधूपूरला गेला त्यावेळीं त्याला कळलं, कीं ज्या दिवशीं आम्ही मधूपूरहून निघालों होतों, त्याच दिवशीं हरमणीचं घर जळून गेलं होतं. हरमणी त्यांत जळून मेली. सकाळीं लोकांनीं जळलेला देह पाहिला तेव्हां त्यांना तो ओळखतां आला नाहीं. मी आजारी होतें अन् हरमणी धडधाकट होती, त्याअर्थीं ती निसटून गेली आणि मी आगींत सांपडलें, असा त्यांनीं अंदाज केला. पुढं तें तसंच झालं असं समजून सारेजण मीच जळून मेलें असं सांगूं लागले. ती बातमी ऐकून तुम्ही पुन्हा इकडे आलां असं ब्रह्मचाऱ्याला कळलं, तेव्हां तो पुन्हा इकडे यायला निघाला. माझ्यानं रहावत नव्हतं म्हणून मी परवांच्या दिवशीं इकडे आलें होतें. आतां चालायची संवय झाल्यामुळं तीन कोस पायीं चालत येणं मला कठीण गेलं नाहीं. तुम्ही आलां नाहीं असं कळलं तेव्हां पुन्हा परत गेलें. काल ब्रह्मचारी आला, तेव्हां त्याला घेऊन गोविंदपूरला आलें. इथं आलें तेव्हां एक प्रहर रात्र झाली होती. दिंड्या अन् दरवाजे खुले होते. मी आंत आलें. कुणी मला पाहिलं नाहीं. जिन्याच्याखालीं बराच वेळ लपून राहिलें होतें. सारीं माणसं झोंपी गेलीं तेव्हां जिना चढून वर आलें. याच खोलींत तुम्ही असाल अशी माझी खात्री होती. हें दार उघडं दिसलं. मी डोकावून पाहिलं—तुम्ही माथ्यावर हात घेऊन बसलां होतां. असं वाटलं, एकदम धांवत जावं आणि तुमचे पाय धरावे !—पण पुन्हा भीति वाटली—मी अपराधी होतें—तुम्ही क्षमा न केली तर !—तुम्हाला पाहूनच माझं समाधान झालं. मी दारा आड्न

पहात होतें--वाटलं, आतां पुढं व्हावं--पुढं येत होतें--पण मला दारांत पहातांच तुम्हाला मूर्च्छा आली. मी धांवत जाऊन तुम्हाला मांडीवर घेतलं. मी अजून तशीच बसून राहिलें होतें. हें भाग्य पुन्हा लाभेल असं मला वाटलं नव्हतं;—पण छीः ! तुमचं प्रेमच नाहीं माझ्यावर ! अंगावर हात ठेवला तरी तुम्ही मला ओळखलं नाहीं ! तुमच्या अंगावरून येणाऱ्या वाऱ्यावरूनसुद्धां मी तुम्हाला ओळखलं असतं ! ''

● ●

## —: ४१ :—

● **शेजघरांत** ते दोन्हीही प्रेमी जीव अशा रीतीनें आनंदांत बोलत असतां तिकडे वाड्यांत भयंकर घटना घडत होती.

नगेन्द्र घरीं आला तेव्हां तो कुंदेला भेटला नव्हता. सारी रात्र कुंद उशींत तोंड खुपसून रडत राहिली होती. कळूं लागल्यापासून तिनें आपलें सर्वस्व नगेन्द्राला अर्पण केलें होतें. पण आतां त्याचा मोबदला मिळणें अशक्य झाल्यामुळें ती हृदय फुटून रडत होती. तिला वाटलें, पतीची भेट होईल या आशेनें कशाला आपण जीव धरून ठेवला ? कोणत्या सुखाच्या आशेसाठीं आतां जगायचें ? '

सारी रात्र रडून जागून काढल्यावर पहाटेच्या सुमाराला कुंदेचा डोळा लागला. पुन्हा तिला तें भयंकर स्वप्न दिसलें. चार वर्षांपूर्वीं बापाच्या मृतदेहा-शेजारीं झोंपी गेल्यावेळीं तिला जी अपूर्व प्रकाशमयी अशी मूर्ति दिसली होती तीच पुन्हा तिच्या स्वप्नांत आली. आतां त्या मूर्तीच्या मुद्रेवर करुणेची छटा नव्हती. तिची मुद्रा गंभीर झाली होती. स्वप्नांत दिसलेली तिची ती आई म्हणाली, "कुंद, त्यावेळीं माझं ऐकलं नाहींस, माझ्याबरोबर आली नाहींस, आतां दुःख काय तें तुला कळलं ना ? "

कुंद रडूं लागली तेव्हां तिची आई म्हणाली, " मी पुन्हा येईन म्हणून तुला वचन दिलं होतं. त्याप्रमाणें आतां आलें आहें. आतां या संसारांतल्या सुखाचा अनुभव घेऊन पुरेसं वाटलं असेल तर चल माझ्याबरोबर ! "

कुंद रडत रडत म्हणाली, " तर मग मला घेऊन चल आई. आतां इथं रहाणं मला नकोसं झालंय. "

तें ऐकून तिची आई प्रसन्न मुद्रेनें म्हणाली, " तर मग चल आतां. "

एवढेंच बोलून ती अंतर्धान पावली.

कुंदा जागी झाली तेव्हां तें स्वप्न आठवून देवाला विनंती करून म्हणाली, " आतां तरी माझं स्वप्न खरं होओ ! "

सकाळींच हिरा कुंदेच्या खोलींत आली त्यावेळीं कुंद रडत होती. कमलमणी आल्यापासून हिरेनें कुंदेशीं नम्रपणें वागायचें ठरवलें होतें. नगेन्द्र येणार अशी बातमी आल्याचाही तो परिणाम होता. एकदम तिच्यांत झालेला हा बदल इतर कुणालाही कळला असता, पण भोळ्या कुन्देला तिचें तें कपट उमगलें नाहीं.

हिरेनें विचारलें, " अशा रडतां आहां कां आईसाहेब ? "

कुंद कांहीं बोलली नाहीं. ती नुसती हिरेच्या तोंडाकडे पहात राहिली. कुंदेचे डोळे पाण्यानें भरले होते आणि उशी भिजून गेली होती असें पाहून हिरा म्हणाली. " हें काय ? सारी रात्र रडतच होतां का ? काय झालं ? बाबू कांहीं बोलले का ? "

" मुळींच नाहीं." कुंद म्हणाली आणि अधिक उमाळा येऊन रडूं लागली.

कांहींतरी विशेष घडलें आहे असें हिरेला वाटलें. कुन्दा रडत असलेली पाहून तिला मनांतून जरी आनन्द झाला होता, तरीही काकुळतीचा भाव आणून ती म्हणाली, " घरीं आल्यावर बाबू तुम्हाला टाकून बोलले का ? मी दासी आहें खरी, पण माझ्याकडे सांगायला कांहीं हरकत नाहीं. "

" कांहीं सुद्धां बोलले नाहींत. " कुंद म्हणाली.

" म्हणतां काय आईसाहेब ! " हिरा अचंबित होऊन म्हणाली, " इतक्या दिवसांनीं भेट झाली अन् कांहींच बोलले नाहींत ? "

" त्यांची माझी भेटच झाली नाहीं. " कुंदा म्हणाली.

आतां तिला रडें अनावर झालें.

हिरा मनांतल्या मनांत अगदीं खूष झाली होती. बळेंच हंसून ती म्हणाली, " छीः छीः! एवढ्यासाठींच का रडायचं? केवढीं संकटं माथ्यावरून गेलीं तरी माणसं तें सहन करतात. अन् भेटायला थोडासा वेळ लागला म्हणून का असं रडायचं? माझ्यासारखं जर तुम्हांला सहन करावं लागलं असतं तर तुम्ही आत्महत्याच केली असती!"

**आत्महत्त्या!** तो अत्यंत अमंगल शब्द कुंदनंदिनीच्या कानावर झणझणला. ती थरथरून शहारली. सारी रात्र कितीतरी वेळ आत्महत्येचा विचार तिच्या मनांत येत होता. हिरेच्या तोंडून तोच शब्द ऐकतांच तिला आतां तो काळिज पिळून जाणवला.

हिरा बोलत होती, "--आतां माझी कहाणी तुम्हांला सांगतें. मी देखील एका माणसावर जीव तोडून प्रेम केलं होतं. तो माझा नवरा नव्हता.—पण हातून घडलेलं पाप धन्यासमोर कबूल करायचं नाहीं तर कोणासमोर कबूल करायचं—"

तिचे ते निर्लज्जपणाचे उद्‌गार कुंदेच्या कानीं गेले नाहींत. एकच शब्द सारखा तिच्या कानावर आदळत होता—**आत्महत्या!** जसें कांहीं कुठलें तरी भूत तिच्या कानाला लागून सांगत होतें, " तुला आत्महत्या करतां येईल! या यातना सहन करणं बरं, कीं मरण बरं?"

हिरा बोलत होती, "--तो माझा नवरा नव्हता तरीही मी लाख नवऱ्यां-पेक्षांही त्याच्यावर जास्त प्रेम करीत होतें. माझ्यावर त्याचं प्रेम नव्हतं—मला तें कळत होतं—त्याचं प्रेम होतं तें एका माझ्यापेक्षां हजार वाट्यांनीं कमी गुणी असलेल्या पापिष्ठेवर—" बोलत असतांना तिनें खालीं नजर करून बसलेल्या कुंदेकडे एकदां जहरी मुद्रेनें पाहून घेतलें. नंतर ती बोलूं लागली, "—मला हें माहित होतं म्हणून मीं पहिल्यापासून त्याला टाळीत होतें, पण शेवटीं आम्हा उभयतांनाही दुर्बुद्धि झाली—" अशा रीतीनें कहाणीची सुरवात करून हीरेनें आपला सर्व इतिहास तिला सांगितला. मात्र तिनें देवेंद्राचें किंवा कुंदेचें नांव उच्चारलें नाहीं. शेवटीं त्यानें लाथ मारून घालवल्याचा इतिहास सांगून ती म्हणाली, " आतां तुम्हीच सांगा, असं झाल्यावर मी काय केलं असेल?"

कुंदेनें 'काय' म्हणून विचारलें तेव्हां दोन्ही हात नाचवीत हिरा म्हणाली, "मी तडक एका मांग वैद्याकडे गेलें. त्याच्याकडे सर्व प्रकारचीं विषं मिळतात. विष खाऊन जीव द्यावा असा विचार करून मी त्याच्याकडून विष घेऊन आलें. पुन्हा मला वाटलं, दुसऱ्याच्यासाठीं मी मरूं कशाला? विषाची पुडी डबींत घालून तशीच पेटींत ठेवून दिली." असें म्हणून हिरा बाहेर गेली आणि एक पेटी घेऊन आली.

तिनें पेटी उघडली आणि डबींत ठेवलेली विषाची पुडी तिनें कुंदेला दाखवली. माशाच्या तुकड्याला पाहून जिभल्या चाटणाऱ्या मांजरासारखी कुंदेची दृष्टी त्या पुडीवर गेली.

हिरेनें ती पेटी झांकली पण तिला कुलूप लावलें नाहीं.

इतक्यांत वाड्यांत शंख नगारे वाजूं लागले. जिकडे तिकडे गडबड सुरू झाली. आश्चर्यचकित होऊन पेटी तशीच टाकून हिरा धांवतच निघून गेली.

मंदभागिनी कुंदनंदिनीनें तेवढ्या वेळांत डबींतली विषाची पुडी चोरली.

● ●

## —: ४२ :—

● हा आनंदोत्सव कसला सुरू झाला होता तें हिरेला पहिल्यानें कळलें नाहीं. वाड्यांतील सारीं लहान मोठीं माणसें, स्त्री पुरुष, बालक बालिका, नोकर चाकर कुणाला तरी घेरून मोठ्यानें गोंगाट करीत होते. जिला घेरलें होतें ती बहुधा स्त्री असावी असें तिचे केंसच तेवढे दिसल्यामुळें हिरेला वाटलें. तिनें पुढें होऊन पाहिलें. कुणी त्या स्त्रीच्या मस्तकाला तेल चोळीत होत्या, तिचे केंस विंचरीत होत्या, कुणी बोलत होत्या, कुणी बडबडत होत्या, तर कुणी आशीर्वाद देत होत्या. त्या मेळाव्यांत कमलमणी हातांत शंख घेऊन वाजवीत नुसती नाचत होती.

तें पाहून हिरा आश्चर्यचकित झाली. तिनें आंत घुसून डोकावून पाहिलें. तिला धक्का बसला.

ती सूर्यमुखी होती.

सूर्यमुखी सर्वांबरोबर गोड गोड बोलत होती, लाजत होती, हंसत होती. तिच्या गालावरून आनंदाचे अश्रू ओघळत होते.

मेलेली सूर्यमुखी जिवंत होऊन घरीं आलेली पाहून हिराला पहिल्यानें तें खरें वाटेना. तिनें कुणाला तरी विचारलें, तें कौसल्येच्या कानीं गेलें. कौसल्येनें पुढें येऊन हिरेला विचारलें, " ओळखलं नाहींस का ग बये ? या घरची लक्ष्मी आली आहे ही—अन् तुझी यमदेवता ! " आज धनीण आल्या-मुळें कौसल्या हिरेला भीत नव्हती.

सर्वांच्या भेटीगांठी झाल्या, न्हाणेमाखणें झालें, तेव्हां सूर्यमुखी कमलच्या कानाला लागून म्हणाली, " चल, तूं अन् मी जाऊन कुंदला भेटूं. तिनं माझं कांहीं केलं नाहीं—तिच्यावर माझा राग नाहीं—ती धाकटी बहीण आहे माझी. "

फक्त कमल आणि सूर्यमुखीच तेवढ्या कुंदेला भेटायला गेल्या. त्या बराच वेळ बाहेर आल्या नव्हत्या. आधीं बाहेर आली ती कमलमणी. तिनें घाबऱ्याघुबऱ्या नगेंद्रला गांठलें आणि त्याला घेऊन ती कुंदेच्या खोलीपाशीं आली. सूर्यमुखी दारांतच होती. ती रडत होती असें पाहून नगेन्द्रनें विचारलें, " काय झालंय ? "

" सर्वनाश झालाय ! " सूर्यमुखी म्हणाली, " एवढ्या दिवसांनीं मला आतां कळून चुकलं, कीं माझ्या नशिबी सुख नाहीं ! सुखाचा क्षण मला पुन्हा लाभावा अन् त्याचवेळीं हें असं कां व्हावं ? "

नगेन्द्र घाबरला. त्यानें पुन्हा विचारलें, " काय झालंय ? "

सूर्यमुखीला पुन्हा रडें कोसळलें. ती म्हणाली, " कुंदेला लहानाची मोठी मी केली. आतां ती माझी छोटी बहीण झाली होती—बहिणीसारखं तिचं मी कोडकौतुक करीन या आशेनं आलें होतें—माझ्या त्या आशेवर निखारा पडला. कुंदेनं विष खाल्लंय. तुम्ही इथंच रहा. मी डॉक्टरला घेऊन येतें. " असें म्हणून सूर्यमुखी निघून गेली.

नगेंद्र एकटाच कुंदनंदिनीजवळ गेला. आंत येतांच त्याला दिसून आलें, कीं कुंदेचा चेहरा काळवंडला होता. डोळे निस्तेज झाले होते. तिचा देह कोसळून पडला होता.

खाटेवर डोकें टेंकून कुंद जमिनीवर बसली होती. नगेंद्र जवळ येत असल्याचें पाहून तिच्या डोळयांतल्या पाण्याला भरतें आलें. तो जवळ येतांच

कोसळलेल्या वेलीसारखी ती त्याच्या पायावर पडली. नगेंद्र गहिंवरून म्हणाला, " हें काय केलंस कुंद ? कां ही बुद्धी आठवली तुला ? "

" असा काय माझा अपराध झाला म्हणून तुम्ही माझा त्याग केला ? " कुंदेनें विचारलें. नगेंद्र निरुत्तर झाला होता. मान खालीं घालून तो कुंद-नंदिनीच्या शेजारीं बसला तेव्हां कुंद म्हणाली, " काल जर तुम्ही असेच आलां असतां, एकदां ' कुंद ' म्हणून मला हांक मारली असती, एकवार माझ्या शेजारीं काल असेच येऊन बसलां असतां, तर मी जीव दिला नसता. थोडेच दिवस मला तुमचा लाभ झाला होता—अजून माझी तृप्ति झाली नव्हती—मी जीव दिला नसता. "

तिचे ते उद्गार ऐकून नगेंद्र गुढघ्यांत मान घालून स्वस्थ बसला. कुंदेला आज वाचा फुटली होती. यापुढें आतां पतीशीं संभाषण करायची संधी तिला मिळणार नव्हती. ती म्हणाली, " छीः छीः ! हें काय ? असे मुकाट्यानं बसूं नका. तुमचं हंसतमुख पहात पहात जर मला मरण आलं नाहीं तर तें मरणाचं सुखसुद्धां मला गोड वाटायचं नाहीं. "

सूर्यमुखीसुद्धां असेंच म्हणाली होती. अंतकालीं साऱ्या स्त्रियांची भाषा सारखीच होते का ?

नगेन्द्रनें सद्गदित होऊन तिला विचारले, " कां हें असं केलंस ? कां मला हांक मारली नाहींस ? "

आकाशभर व्यापून राहिलेल्या ढगांना फोडून बाहेर येण्याऱ्या बिजली-सारखी हंसत कुंद म्हणाली, " सारं विसरून जा. मी आतां बोललें ती मनाच्या उद्वेगामुळं. तुम्ही यायच्या पूर्वीच मी ठरवलं होतं, कीं तुम्हाला पाहीन तेव्हांच मरेन. पहिल्यापासूनच माझा निश्चय होता, कीं दिदी जर कधीं परत आली तर तिच्या हातीं तुम्हाला सोंपवून मरून जायचं—तुमच्या सुखांत कांटा होऊन राहायचं नाहीं.—मरावं असं तेव्हां वाटत होतं, पण आतां तुम्ही समोर दिसल्यावर जीव सोडणं कठीण होतंय मला ! "

कुंद कांहीं वेळ उगीच राहिली. तिची वाचाशक्ती थकत आली होती. मृत्यूची पकड घट्ट होत चालली होती. जिवाचा आटापिटा करून ती पुन्हा बोलूं लागली, " तुमच्याशीं बोलायची तहान अजून मिटली नाहीं. मी तुम्हाला

देव म्हणून मानीत होतें—धीर करून अशी तोंड उघडून तुमच्याशीं कधीं बोललें नव्हतें. ती माझी बोलायची भूक अजून भागली नाहीं. माझा देह थकत चालला आहे, जीभ कोरडी पडते आहे, आतां संपत आलं आहे सारं—" असें म्हणून तिनें नगेन्द्राच्या मांडीवर डोकें टेकलें आणि डोळे झांकून घेतले.

डॉक्टर आले. तिला तपासून पाहिल्यावर औषध द्यायचा प्रयत्न न करतां एवढेंसें तोंड करून ते निघून गेले. सूर्यमुखी आणि कमलमणी धांवतच आल्या. कुंदेनें पडल्यापडल्याच त्यांची पायधूळ घेतली तेव्हां त्या हंबरडा फोडून रडूं लागल्या.

कुन्देनें नवऱ्याच्या दोन्ही पायावर मस्तक ठेवलें. ती थंड पडत चालली आहे असें पहातांच त्या दोघींनींही हंबरडा फोडला पण त्यानंतर कुन्देच्या तोंडून शब्द बाहेर पडला नाहीं. ऐन तारुण्यांत कुंदनंदिनीनें पतीच्या चरणावर मस्तक ठेवून प्राणत्याग केला.

ती उमलती कुंदकळी तिथल्या तिथेंच सुकून गेली.

रडत रडत सूर्यमुखी म्हणाली, " केवढी भाग्यवती ही ! माझ्या अदृष्टांत असलंच हें भाग्य लाभो ! पतीच्या चरणांवर असंच मस्तक ठेवून माझा हा देह पडो ! "

कुंदनंदिनी स्वर्गवासी झाली. नगेंद्रानें यथाविधी तिची उत्तरक्रिया केली आणि ती अतुलनीय अशी सुवर्णप्रतिमा विसर्जन करून तो घरीं परत आला.

● ●

## —: ४३ :—

● **कुंदनंदिनीच्या** मृत्यूनंतर प्रत्येकजणाला हाच प्रश्न पडला होता, कीं कुन्दनंदिनीला विष कुठें सांपडलें ? सर्वांना हिरेचाच संशय येत होता. हिरा कुठें दिसत नव्हती म्हणून नगेंद्रनें तिला बोलावणें पाठवलें, पण हिरेचा पत्ता लागला नाहीं. कुन्दनंदिनीचा मृत्यू झाल्यानंतर हिरा नाहींशीं झाली होती.

तेव्हांपासून हिरा गोविंदपूरच्या कुणाही माणसाला कधीं दिसली नाहीं. गांवचे लोक हिरेचें नांवसुद्धां विसरून गेले. एक वर्षानंतर ती देवेंद्राला दिसली.

त्यावेळीं देवेंद्र आपण लावलेल्या विषवृक्षाचीं फळें चाखीत होता. अत्यंत घाणेरड्या अशा रोगानें तो सडून गेला होता. अजून त्याची दारू सुटली नव्हती, त्यामुळें रोगही वाढला होता.

तो मृत्यूशय्येवर पडला होता. कुंदनंदिनीच्या मरणानंतर एक वर्षानें देवेंद्रही मरणाच्या दारीं उभा होता. तो मरायच्या पूर्वी चार दोन दिवस त्याच्या दाराशीं कसली तरी गडबड सुरू झाली. देवेंद्रानें विचारलें तेव्हां नोकर म्हणाला, " एक वेडी आपल्याला भेटायला आली आहे. आम्ही नको म्हटलं तरी ती ऐकत नाहीं. " देवेंद्रनें तिला आंत पाठवायला सांगितलें तेव्हां ती आंत आली.

ती तशी अगदींच वेडी दिसत नव्हती. ती कुणीतरी भिकारीण असावी असें त्याला वाटलें. ती वयानेंही तरूण असावी. पूर्वीच्या ओसरलेल्या सौंदर्याचीं लक्षणें तिच्या चेहऱ्यावर दिसत होतीं. तिच्या अंगावरच्या कपड्यांनां शंभर ठिगळें लावलेलीं होतीं आणि त्यानीं तिचें अंग नीटसें झांकलेंही जात नव्हतें. तिच्या केंसाच्या जटा झाल्या होत्या आणि तिच्या सर्वांगावर खवडे उठले होते.

बराच वेळ पर्यंत ती देवेंद्राकडे पहात होती. नंतर तिनें विचारलें, " मला ओळखलं नाहीं ? मी हिरा ! "

देवेंद्राला ओळख पटली. त्यानें विचारलें, " अशी कां दशा झाली तुझी ? "

हिराचा राग एकदम भडकला. पहिल्यानें ती दांत ओंठ खात मुठी वळून त्याच्या अंगांवर धांवून जात होती. लगेच ती थांबली आणि म्हणाली, " तूं विचारतोस हें ? कां माझी अशी दशा केलीस ? तूंच माझा सत्यानाश केलास अन् आतां माझी ओळख पटत नाहीं तुला ? हा तूंच एक दिवस माझी खुषामत करीत होतास. तुला आठवतं ना ? एक दिवस याच जागीं बसून तूं माझे पाय धरलेस—( असें म्हणून हिरेनें त्याच्या खाटेवर पाय ठेवला. )–आणि गाऊं लागलास स्मरगरलखंडनम् मम शिरसि–मंडनम् देहि पदपल्लवमुदारम् ! "

एक एक गोष्टी आठवून आठवून ती बोलत होती. नंतर ती म्हणाली, " मला भ्रष्ट करून ज्या दिवशीं तूं मला लाथ मारून घालवून दिलंस त्याच दिवशीं मी पागल झालें होतें—विष खायला गेलें होतें—पण मला एक कल्पना सुचली. मी विष खायच्या ऐवजीं, एक तें तुला तरी घालीन कीं कुंदेला तरी घालीन! तो वेडाचा झटका केव्हां येई, केव्हां जाई. ती वेडाची लहर आली कीं मी खोलींत कोंडून बसें. लहर ओसरली कीं कामावर जात असें. शेवटीं कुंदेला विष पाजलं तेव्हां माझा अंतरात्मा शांत झाला—पण तिला मेलेली पहातांच मला पुन्हा झटका आला. तें वेड झांकतां येईना. मी गांव सोडून निघालें. अन्नासाठीं वणवण करीत होतें. वेडीला कोण अन्न देणार होतं? तेव्हांपासून भीक मागूं लागलें. डोकं ठिकाणावर असलं कीं भिक्षा मागत फिरे अन् तें भडकलं म्हणजे झाडाखालीं पडून राहीं. तूं मरायला टेकला आहेस असं ऐकलं तेव्हां मला मोठा आनंद झाला. म्हणूनच तुला भेटायला आलें. माझा आशीर्वाद आहे तुला—नरकांतसुद्धां तुला जागा मिळायची नाहीं!" असें म्हणून ती हो हो करून हंसत सुटली.

देवेंद्रानें घाबरून तोंड फिरवलें. तीच अष्टपदी गात गात नाचत नाचत हिरा घराबाहेर पडली.

तेव्हांपासून देवेंद्राच्या मृत्युशय्येवर कांटे पसरले गेले. त्याचा ताप भडकला. भ्रमांत तो सारखा म्हणत होता,—" पदपल्लवमुदारम् पदपल्लवमुदारम्!"

देवेंद्राच्या मृत्यूनंतर कित्येक दिवस त्याच्या त्या बगीच्यांत रात्रीच्या वेळीं लोकांच्या कांनीं कुणीतरी स्त्री गात असल्याचें ऐकूं येई—

**स्मरगरलखंडनम् मम शिरसिमंडनम्**
**देहि पदपल्लवमुदारम्**

आम्ही विषवृक्ष इथेंच संपवला. याच्या वाचनानें घरोघर अमृताच्या उगम होवो एवढीच आमची इच्छा!

